The Department of Public Instruction, Bombay.

# UTTARARÁMACHARITRA

A DRAMA IN SEVEN ACTS

TRANSLATED FROM SANSCRIT INTO MARÁṬHÍ

BY

PARASHURÁMAPANTA GODBOLE.

SECOND EDITION—3000 Copies.



---

**BOMBAY.**

GOVERNMENT CENTRAL BOOK DEPÔT.

---

1881.



*Price Eight Annas.*

मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

84

# उत्तररामचरित्र नाटक

सप्तांकी.

हा ग्रंथ संस्कृत मूलग्रंथा वरून

मराठी भाषेंत

परशुरामपंत गोडबोले

ह्यांनीं केला

दुसरी आवृत्ति.

३००० प्रती.






मुंबई.

गवर्नमेंत सेंत्रल बुक दिपो.

इसवी सन १८८१.



किंमत आठ आणे.

# प्रस्तावना.



धारानामक राजधानींत भोजराजाजवळ बहुत पंडित होते, त्यांत कालिदासाच्या बरोबरीचा भवभूति ह्या नामें एक महा विद्वान् कवि होता. त्यानें संस्कृत भाषेंत तीन उत्तम नाटकें केलीं. एक मालतीमाधव, एक वीरचरित्र, आणि एक उत्तररामचरित्र. त्यांत उत्तररामचरित्र हें नाटक विशेषेंकरून विद्वानांस मान्य व रसिकजनांस प्रिय असें आहे. नाटकाचे जे गुण ते सर्व ह्या नाटकांत कवीनें आणिले आहेत. परंतु हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे ह्मणून त्यांतील रस संस्कृत भाषा जाणणाऱ्या पुरुषांस मात्र प्राप्त होतो, प्राकृत जनांस होत नाहीं; म्हणून तो सर्वांस प्राप्त व्हावा ह्या उद्देशानें त्या नाटकाचें हें मराठी भाषांतर केलें आहे.

त्या कवीनें जो आपल्या ग्रंथांत रस उभा केला आहे तसा रस साधणें इतरांस फार कठीण आहे; तथापि यथामति साधवला तितका साधला आहे. आतां याहून उत्तम प्रतीचें भाषांतर होई तोंपर्यंत हें हातीं घेण्यास रसिकजन अनमान करणार नाहींत अशी ह्या भाषांतर कर्त्यास आशा आहे.

संस्कृत भाषेच्या आंगीं शब्दप्रौढी, शब्दलालित्य, अर्थप्रौढी, अर्थलालित्य, अर्थगांभीर्य, मनोरंजकता, इत्यादि गुण आहेत, तसे ह्या मराठी भाषेंत नाहींत, ह्यामुळें, आणि कविताशक्ति असावी तशी नाहीं ह्यामुळें, संस्कृतांतल्या प्रमाणें रसपरिपाक उतरणार नाहीं हें ही उघडच आहे.

मूळ संस्कृतग्रंथाचें हें भाषांतर असें ह्मटलें, परंतु केवळ

शब्दास शब्द अशा रीतीनें केलेलें असें नाहीं. क्वचित् स्थळीं न्यूनाधिक्य केलें आहे.

मूळग्रंथ गद्यपद्यात्मक आहे. त्याप्रमाणें ह्यांत ही गद्यांचे ठिकाणीं गद्यें आणि पद्यांचे ठिकाणीं पद्यें केलीं आहेत. श्लोकांचीं वृत्तें मूळग्रंथाप्रमाणेंच सर्व आहेत असें नाहीं; ज्या ठिकाणीं जसें साधलें त्याठिकाणीं तसें केलें आहे. कितीएक ठिकाणीं आर्या आहेत. कितीएक ठिकाणीं साक्या, दिंड्या, ओंव्या, पदें, अशीं ही प्राकृत कवितेच्या चालीप्रमाणें पद्यें केलीं आहेत.

ह्या ग्रंथास उत्तररामचरित्र हें नांव ठेवण्याचें कारण हेंच कीं, भगवान् रामचंद्र अयोध्यापुरींत सिंहासनारूढ झाल्यावर जें चरित्र झालें तें ह्या ग्रंथांत बांधलें आहे.

मूळग्रंथाचे सात अंक ह्मणजे भाग आहेत, त्याप्रमाणें येथेंही सात अंक केले आहेत. पहिल्या अंकांत लोकापवादामुळें रामानें सीतेचा त्याग केला आहे; दुसऱ्या अंकांत शंबूकवधाच्या निमित्तानें रामचंद्र पंचवटीस गेला आहे; तिसऱ्या अंकांत सीतेच्या विरहानें रामास फार शोक झाला आहे; चवथ्या अंकांत वाल्मीकिमुनीच्या आश्रमास कौसल्या, जनक, वसिष्ठ हे गेले आहेत; पांचव्या अंकांत चंद्रकेतु आणि लव, कुश ह्यांचा युद्ध प्रसंग झाला आहे; सहाव्या अंकांत रामाची आणि लव,कुश ह्यांची भेट झाली आहे;आणि सातव्या अंकांत सर्वांच्या भेटी होऊन वाल्मीकिमुनीनें रामाची आणि सीतेची भेट करून दिली आहे.

मूळग्रंथांत संस्कृत भाषा आणि बालभाषा अशा दोन प्रकारच्या भाषा आहेत, परंतु ह्या भाषांतरांत एक मराठी भाषा मात्र आहे. कोठें कोठें हवेतसे मराठी शब्द न सुचल्यामुळें निरुपाय होऊन संस्कृत भाषेंतले शब्द घेतले आहेत. तथापि त्यां-

चा अर्थ समजण्यास त्यात्या पृष्ठाचे खालच्या आंगास टिपा दिल्या आहेत.

हा ग्रंथ बहुतकरून परस्पर संभाषणरूप आहे. ह्यांत आरंभीं बोलणाराचें नांव लिहून पुढें त्याचें बोलणें लिहिलें आहे. ज्या ठिकाणीं दोहोंकडे (          ) अशा खुणा करून जें त्यांच्या मध्यें वाक्य लिहिलें आहे त्या ठिकाणीं तें वाक्य अर्थ संगतीकरितां कवीचें आहे असें समजावें.

नाटक ग्रंथ जो कोणी वाचावयास घेतो त्यानें इतिहास किंवा बखर इत्यादि ग्रंथाप्रमाणें साधे रीतीनें तें एक सारखें वाचूं नये. परस्पर भाषणाची लोकरीति मनांत आणून उच्च, नीच, कोमल, कठोर अशा स्वरभेदानें वाचावें, ह्मणजे वाचणाऱ्यांच्या व ऐकणाऱ्यांच्या मनांत रसाविर्भाव होतो.

ह्या नाटकांत करुणरस आणि शृंगाररस हे प्रधान आहेत. शृंगार आहे तो विप्रलंभ शृंगार, ह्मणजे वियोग काळींचा शृंगार वर्णिला आहे.

हें भाषांतर यथामति केलें आहे. ह्या ग्रंथांत चुका अर्थाविषयीं आणि शब्दाविषयीं पुष्कळ असतील, परंतु त्यांजकडे दृष्टि न देतां गुणलेशाकडे दृष्टि देऊन उणें असेल तें पूर्ण करणें आणि ग्रंथास मान देणें हें विद्वानांस भूषण आहे.

ह्याप्रमाणेंच दक्षिणाप्रैज कमिटींतील सभासद ह्यांनीं हा ग्रंथ मान्य करून ते भूषण मिळविलें येणेंकरून लोकांस नवीन ग्रंथ करण्याविषयीं उत्तेजन दिल्याप्रमाणें होऊन तद्द्वारा ते लोकोपकाराचे विभागी झाले आहेत.

---

शंकर नारायण भागवत

# उत्तररामचरित्र नाटक.

---

## अंक १.

### स्थल.

अयोध्येंतील राजमंदिर.

### पात्रें.

| | |
|---|---|
| सूत्रधार | नाटककर्ता. |
| नट | त्याचा सोबती. |
| रामचंद्र | अयोध्याधीश. |
| सीता | त्याची स्त्री. |
| कंचुकी | चोबदार. |
| अष्टावक्र | वसिष्ठ शिष्य. |
| लक्ष्मण | रामचंद्राचा भाऊ. |
| द्वारपालिका | अंतःपुरांतील दासी. |
| दुर्मुख | बातमीदार. |

मंगलाचरण.

### पद.

गणराया लौकर यावें ॥ गणराया लौकर यावें ॥ ध्रुपद ॥
करुनि दया दीनावर सदया ॥ सहज बुद्धिबळ द्यावें ॥गण०॥१॥
सुर नर किंनर ध्याती तुजला ॥ विघ्नविनाशा धांवें ॥ गण०॥२॥
शिवसुत मंगलदायक देवा ॥ दासां मंगल द्यावें ॥ गण० ॥ ३ ॥

आणिक कांहीं न मागें आतां॥कार्य सिद्धिला न्यावें ॥गण०॥४॥
नारायणसुत[1] विनवितसे कीं॥येउनि पद दावावें ॥ गण० ॥ ५ ॥

## नांदी—आर्या.

हा प्राचीनकवींला संतत माझा असो नमस्कार ॥
ज्यांच्या अनुग्रहानें वाणी पावेन मी सुधासार[2] ॥ १ ॥

( नांदी[3] झाल्यावर सूत्रधार ह्मणतो. )

होहो, फार विस्तार कशास पाहिजे. आज मी भगवान् श्रीमहाकालेश्वर[4] ह्याच्या यात्रेसाठीं जमलेल्या महाजनांस विनंती करितों. अहो, आपण जाणतच आहां कीं, काश्यपगोत्रोत्पन्न, ज्याला श्रीकंठ हें प्रतिष्ठा नाम आहे असा भवभूतिनामा[5] महाकवि आहे.

## आर्या.

ब्रह्याला तशि ज्याला[6] वाग्देवी[7] होउनी सुवश[8] राहे ॥
हा[9], तत्कविरचितोत्तर रामचरित्र प्रयोग[10] करिताहे ॥ २ ॥

---

१ ग्रंथकार हे परशराम बल्लाल अशी सही करीत असत, पण त्यांचे वडिलांचें खरें नांव नारायण होतें म्हणून येथें नारायण सुत असें म्हटले आहे. २ अमृततुल्य. ३ मंगलाचरण. ह्या पासून देवतांस आनंद होतो, म्हणून ह्यास संस्कृतांत नांदी असें म्हणतात. ही नांदी अष्टपदा, द्वादश पदा, अष्टादशपदा आणि द्वाविंशति पदा अशी चार प्रकारची आहे ( प्रतापरुद्र, नाट्य प्रकरण पहा ). त्यांतील ही द्वादशपदा आहे. नांदीची पदें १२ वरती तोडून दाखविलींच आहेत. आरंभीं जें गणपतीचें पद लिहिलें आहे, तें लौकिक नाटकाच्या चाली प्रमाणें आहे. तें साहित्य शास्त्रांतील नाटक नियमास अनुसरून नाहीं. ह्मणून मूळ संस्कृत नाटकांतील नांदीच्या श्लोकाचें येथें आर्या छंदानें भाषांतर केलें आहे तीच मुख्य नांदी होय. ४ उज्जयिनी मध्यें जें शिवलिंग आहे त्याचें नांव. ५ भवभूति शब्दाचा अर्थ—भव म्हणजे शिव, त्याची भूति म्हणजे अंश, असा होतो, पण त्याची अपूर्व कवित्व शक्ति पाहून हें सुद्धा नांव अपूर्ण वाटून श्रीकंठ म्हणजे साक्षात् शिवच असें दुसरें नांव लोकांनी त्यास दिलें. ६ ज्या भवभूतीला. ७ सरस्वती. ८ अनुकूल. ९ मी. १० खेळ.

भवभूति कवीनें जें उत्तररामचरित्र ह्मा नांवाचें नाटक केलें आहे त्याचा प्रयोग ( खेळ ) तुह्मां पुढें करितों. तर इकडे तुमचें अवधान असावें.

हा मी कार्य[1]वशें करून अयोध्येंतला आणि त्या काळचाच असा झालों आहें. ( इकडे तिकडे पाहून ह्मणतो. ) अहो राक्षस कुलाचा संहार करणारा जो महाराज रामचंद्र ह्माचा जर हा राज्याभिषेकोत्सवाचा समय आहे. तर ह्मा समयीं रात्रंदिवस एकसारखा जिकडेतिकडे नृत्यगीत वाद्यांनीं आनंद असावयाचा; असें असतां आज कोठें गडबड दिसत नाहीं हें काय ?

(नट प्रवेशकरून, आसमंतात्‌भागीं अवलोकन करून ह्म०) हे सूत्रधारा, तुला समजलें नाहीं काय? अरे, लंकायुद्धांत ज्यांशीं सख्य झालें होतें असे मोठमोठे वानर आणि राक्षस लंकेहून येतांना बरोबर आणले होते, आणि राज्याभिषेकाच्या समारंभाकरितां देशोदेशींचे राजर्षि, ब्रह्मर्षि आदिकरून मोठमोठे लोक मिळाले होते, त्यांच्या सत्काराकरितां इतके दिवस गडबड चालली होती. आतां ते सर्व लोक महाराजानें आपापल्या स्थानास परत पाठविले. आतां कशाची गडबड असणार !

सूत्रधार—होय खरी गोष्ट. ( स्मरल्यासारखें करून. ) हो, सांप्रतकाळीं आणखी असें झालें आहे.

### साकी.

अरुंधतीसह वसिष्ठ घेउनि रामाच्या ज्या माता ॥
त्याही गेल्या [2]तदाश्रमातें [3]सुखवाया [4]जामाता ॥ ३ ॥

---

१ नाटकाचा खेळ करण्याचें कार्य कर्तव्य असल्या मुळें. २ ऋष्यशृंगऋषींच्या आश्रमास. हा आश्रम बंगाल्यांत कुशी ( कौशिकी ) म्हणून जी नदी

नट—सूत्रधारा, मी परदेशचा आहें, मला ठाऊक नाही ह्मणून मी विचारतों. जामाता ह्मटला हा कोण ?

सूत्र०—तुला नाहींका ठाऊक ? सांगतों ऐक.

### आर्या.

शांतानामें पूर्वी दशरथराजास जाहली कन्या ॥
तेणें अपत्यभावें लोमपदाला समर्पिली धन्या ॥ ४ ॥

### साकी.

विभांडकाचा सुत जो ऋष्यशृंग तयानें केला ॥
पाणिग्रह शांतेचा तेणें तो जामाता झाला ॥ ५ ॥

### आर्या.

सांप्रत तेणें द्वादश वार्षिक आरंभिलें महासत्र ॥
तें कौतुक देखाया श्वशुरगृहालागि धाडिलें पत्र ॥ ६ ॥

### साकी.

जाणुनि जामात्यानें याया आग्रह फारचि केला ॥
गर्ववतीही सीता टाकुनि गुरुजन तिंकडे गेला ॥ ७ ॥

---

उत्तरे कडून येऊन गंगेस मिळते तिचे कांठी होता. (भारत वनपर्व, अ० ११०, श्लोक २३,) ३ मनाचा संतोष करण्यास. ४ जांवई ऋष्यशृंग ऋषि हा कश्यप कुलोत्पन्न विभांडक ऋषीचा पुत्र. विभांडक एकदा गंगातीरीं स्नानास गेला असतां तेथें उर्वशी अप्सरा त्याच्या दृष्टीस पडली तेव्हां त्यास काम उत्पन्न होऊन त्याचे रेत गंगेत पडले. तें ऋष्य जाति विशेषाची हरिणी पाणी पीत असतां तिचे पोटांत गेलें त्या पासून हा उत्पन्न झाला. हा सर्व मनुष्याकृतिच होता पण त्याचे मस्तकावर ऋष्य जातीच्या हरणाचें शिंग होतें म्हणून त्याचें ऋष्यशृंग हें नाव पडलें. (भार० वनप० अ० ११० पहा) १ लोमपाद राजाचेंच अपत्य व्हावें म्हणून.

* लोमपादाचेंच अपत्य व्हावें म्हणून. १ लोमपाद हा अंगदेशचा राजा होता (वा०रा०बा०कांड स०९, श्लोक ८, पहा,) अंगदेश हा हल्लीचा भागलपूरचे जवळचा प्रदेश होतो. २ दत्तकदिली. ३ विवाह. पूर्वी ब्राम्हणाला चार ही वर्णांच्या स्त्रिया करण्यास हरकत नव्हती. (मनुस्मृति अध्याय ३, श्लोक १३, पहा). तेव्हां ऋष्यशृंगाने क्षत्रिय कन्या केली ह्यांत कांही विरुद्ध नाहीं. ४ मोठा यज्ञ. ५ दशरथाच्या घरीं ६ कौसल्यादि वडील मंडळी. ७ ऋष्यशृंगऋषीच्या आश्रमास.

असो, हें आपणास कशास पाहिजे. चला आपण आपल्या जातीच्या चालीप्रमाणें राजद्वारीं जाऊन राजाची स्तुति करूं.

नट—तर मग, राजाची उत्तमप्रकारें स्तुति करण्याचा शुद्ध प्रकार कोणता तो आपणच सांगावा.

सूत्र०—मारिषा, ऐकतोस ! असें आहे.

## आर्या.

वाग्व्यवहार करावा अनिंद्यतेला असे कुठें थारा ॥
स्त्रीच्यापरी वाणीच्या साधुत्वीं लोक दुर्जनचि सारा ॥ ८ ॥

नट—अतिदुर्जन असें का ह्मणाना ? वाणीला स्त्रीची उपमा दिली, ह्यावरून माझ्या मनांत आलें.

## आर्या.

जन सापवाद सीते विषयीं हें नवल केवढें मोठें ॥
रक्षो गृहवास खरा मानिति जन अग्निशुद्धिला खोटें ॥ ९ ॥

सूत्र०—असें झालें आहे खरें, मला वाटतें जर ही वार्ता राजा रामचंद्राच्या कानावर गेली तर फार वाईट होईल. काय होईल तें होऊ.

नट—असो, ऋषि आणि देवता सर्वप्रकारें कल्याण करतील. ( असें बोलून इकडे तिकडे फिरतो. ) कायहो, ह्यासमयीं रामचंद्रमहाराज कोठें आहेत बरें ? ( ऐकलेंसें करून ह० ) हां, लोक असें ह्मणतात.

---

१ भाषणक्रिया. २ स्तुत्यपणास. ३ आश्रय किंवा ठिकाण. ४ चांगुलपणाविषयीं. ५ दोषलावणाराच. ६ निंदाकरणारा. ७ रावणाच्याघरीं राहणें. ८ सीता अग्नींत जाऊन शुद्ध झाली ह्या गोष्टीला.

## ओंव्या.

केन्या आणि जांवई यांतें ॥ भेटावया दोघांतें ॥
जनकराजा अयोध्येतें ॥ आला होता सकुटुंब ॥ १० ॥
येथें कांहीं दिवस राहोन ॥ परमोत्सवें घालवूनि दिन ॥
घेऊन रामाचें अनुमोदन ॥ विदेहदेशापैं गेला ॥ ११ ॥
यास्तव सीतेचें मानस ॥ स्वस्थ नाहीं रात्रंदिवस ॥
बंधुजनाचा वियोग तीस ॥ दुःखमद झाला असे ॥ १२ ॥
असतां रामचंद्र धर्मासनीं ॥ वार्ता ऐकिली हे कानीं ॥
सीतासांत्वन करावयालागुनी ॥ अंतःपुरीं प्रवेशला ॥ १३ ॥

( असें बोलून दोघे निघून जातात. )

ही पुढील कथेची प्रस्तावना.

( तदनंतर आसनस्थित रामचंद्र आणि सीताहीं येतात ).

राम०—हेदेवी जानकी, सावध हो. असें कायकरतेस ? ते गुरुजन आपणास सोडून जाण्यास इच्छित नव्हते, परंतु काय करतील. अडचणीमुळें त्यांस जाणें प्राप्त झालें. असें आहे पहा.

---

१ सीता. २ रामचंद्र. ३ मैथिल देशास. ह्याला हल्लीं तिरहूट म्हणतात. ४ मातापितरांचा. ५ सिंहासनीं. ६ सीता अस्वस्थ आहे अशी ७ सीतेच्यामंदिरांत. ८ सूचना. संस्कृतांत नाट्य प्रकरणीं प्रस्तावनेचे पांच प्रकारसांगितले आहेत ( साहित्य दर्पण, पृष्ट १३९ आवृत्ति १८२८ पहा ). त्यांतील हीप्रयोगातिशय रूप प्रस्तावना आहे. प्रयोग म्हणजे चालू गोष्ट तिचा अतिशय करून म्हणजे ती सोडून दुसरीच गोष्ट मध्यें आणून त्या गोष्टीनेच पात्र प्रवेश होतो ती. येथें रामाची स्तुति करण्याचा प्रयोग प्रस्तुत असून रामाचा अंतःपुर प्रवेश रूप दुसरा प्रयोग मध्यें आणून राम व सीता ह्या पात्रांचा प्रवेश केला आहे.

### श्लोक.

कीं अनुष्ठान नित्यत्व स्वातंत्र्यांलागि मोडितें ॥
संकटा आहिताग्नीची भैत्यवायें गृहस्थता ॥ १४ ॥

सीता—महाराज, हें मी जाणतें, पण काय करूं. बंधुजनांचा वियोग दुःख फार देतो. सर्ववडील माणसें एकदांच निघून गेलीं, यामुळें चित्तास स्वस्थता वाटत नाहीं.

राम०—खरेंच आहे. संसारांतील जितके पदार्थ तितके हृदय मर्म भेदणारे आहेत. ह्मणूनच जे विचारशील मुनि आहेत ते सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत जाऊन स्वस्थ राहतात.

( इतक्यांत कंचुकी येतो. )

कंचुकी—हे रामभद्र, ( इतकेंच अर्ध बोलून शंकित होतो. ) अहो महाराज.

राम—(किंचित् हास्य करून). नांव कशासाठीं फिरविलें? तुह्मी वडिलांच्या पदरच्या मनुष्यांनीं रामभद्र ह्मणावें हाच सन्मान मला शोभतो. तर नित्याच्या परिपाठाप्रमाणेंच बोलावें.

कंचुकी—महाराज ऋष्यशृंगमुनीच्या आश्रमाकडून अष्टावक्र आला आहे.

---

१ होमादि अनुष्ठानाची नित्य करण्याची आवश्यकता. २ स्वतंत्रपणा ठेवीत नाहीं. ३ संकट देणारी. ४ साग्निकगृहस्थाची. ५ क्रियावैगुण्यानें. ६ माता पिता सासू यांची ७ चोपदार. ८ बाळा, रामा, अशा प्रकारचें वडिलांनी बोलावयाचें ममतेचें संबोधन. ९ हा कहोळ ऋषीचा पुत्र. एकदां कहोळ वेदाची आवृत्ति करित बसला असतां हा आपल्या सुजाता नामक मातेच्या गर्भांत असून तेथूनच पित्यास म्हणाला कीं तुम्हास आजून आवृत्ति करावी लागते काय? तेव्हां पित्यानें आठ ठिकाणीं वक्र होशील असा शाप दिला म्हणून हा अष्टावक्र झाला.

**राम**०—मग त्याला इकडे येण्यास इतका उशीर कां ? लौकर येऊं द्या.

**कंचुकी**—आज्ञा महाराज. ( बाहेर जाऊन अष्टावक्रास आंत पाठवितों. )

**अष्टावक्र**—( आंत येऊन. ) तुह्मां उभयतांचें कल्याण असो.

**राम**०—आर्या, मी वंदन करतों. येथें आसनावर बसावें.

**सीता**—माझाही प्रणाम तुह्मांस असो. सर्व वडील माणसें खुशाल आहेतना ? आणि शांता वन्सें खुशाल आहेत ना ?

**राम**०—आमचा मेव्हणा भगवान् ऋष्यशृंग आणि आमची भगिनी शांता आका याचें यज्ञानुष्ठान कर्म निर्विघ्नपणें यथास्थित चालत आहेना?

**सीता**—तीं आमचें स्मरण करतात काय ?

**अष्टावक्र**—( खालीं बसतो. ) स्मरण करतात यांत काय संशय. हे देवी सीते, भगवान् वसिष्ठगुरु ह्यांनीं तुला असें सांगितलें आहे. कीं,

### श्लोक.

विश्वंभरा प्रसवली तुज राजकन्ये ॥
आहे प्रजापतिसमान पिताहि धन्ये ॥
तूं सून जाहलिस त्या वर पार्थिवांची ॥
ज्यांचा असे कुलगुरू रवि मी तसाची ॥ १५ ॥

ह्यापेक्षां अधिक तें तुला आम्ही काय इच्छावे. आतां आम्ही एवढेंच इच्छितों कीं, तुझ्या पोटीं वीरपुत्र व्हावा.

**राम**०—हा त्यांनीं आह्मांवर अनुग्रहच केला. कांकीं,

---

१ पृथ्वी. सीता ही जमिनी मध्यें पेटींत सांपडली होती म्हणून तिला पृथ्वी प्रसवली असें म्हटलें आहे. २ जनकराजा. ३ रघुकुलांतील श्रेष्ठ राजाची. ४ सूर्य. ५ पराक्रमी पुत्र.

## आर्या.

साधारणसाधूंची धांवे अर्थाकडे सदा वाचा ॥
परि ह्या आद्यऋषींच्या वाणिकडे अर्थ धांवतो साचा ॥१॥

अष्टा०—राजा, तुला अरुंधतीनें, तुझ्या आयांनीं, आणि शांता बाईनें निरनिराळें वारंवार सांगितलें आहे, कीं, जानकी गरोदर आहे, जर तिला एखादा डोहळा झाला तर तो लागलाच अवश्य पूर्ण करावा.

राम०—ही जें जें सांगते तें तें मी करीतच आहें.

अष्टा०—बाई जानकी, तुझ्या नणंदेचा पति ऋष्यशृंग यानें तुला सांगितलें आहे कीं, वत्से तूं गर्भिणी असून, तुझे दिवस पूर्ण होत आले आहेत म्हणून तुला इकडे आणिले नाहीं. आणि तुला कर्मणूक व्हावी म्हणूनच रामचंद्रास तेथें ठेविलें आहे. आतां तूं मांडीवर पुत्र घेतला आहे असें मी तुला पाहीन.

राम०—( आनंदानें किंचित् हास्य करून ह्म० ) बरें, असेंच होवो. मुने, वसिष्ठ गुरूंनीं मला काय आज्ञा केली आहे?

अष्टा०—ऐकावें. वसिष्ठांनीं असें सांगितलें आहे.

## आर्या.

आह्मी जामात्याच्या दीर्घा सत्रांत गुंतलों सारे ॥
तूं बाल राज्यहि नवें ह्मणुनि तुला एक सांगतों बा रे ॥१७॥
तूं लोक रंजनाच्या यत्नीं रामा करूं नको तोटा ॥
त्या पासूनि यश मिळवीं इतरधनाहूनि लाभ हा मोटा॥१८॥

---

१ होणारी गोष्ट पाहून तसी वाचा निघते. २जशीवाचा निघेल तशी गोष्ट घडते. ३ ऋष्यशृंगाच्या. ४ द्वादशवार्षिकयज्ञसमारंभांत. ५ लोकांस बरें वाटण्याच्या. ६ कमताई, आळस. ७ लोकरंजन.

**राम०**—हां असेंकाय ? तर गुरु वसिष्ठ आज्ञा करतात तसेंच मी करीन. पहा.

### आर्या.

जनरंजनाहुनि मला स्नेह दया सौख्य हें अधिक नाहीं ॥
किंबहुना जानकिही टाकलिया मज नसे व्यथा कांहीं ॥१९॥

**सीता**—ह्या मुळेंच आपणाला रघुकुळांत धुरंधर ह्मणतात.

**राम०**—कोण आहेरे तिकडे ? ह्या अष्टावक्रामुनीची नीट स्वस्थता करा.

**अष्टाव०**—( उठून इकडे तिकडे पाहून ह्मणतो. ) अहो कुंमार लक्ष्मण आला. ( असें बोलून निघून जातो. )

**लक्ष्मण**—( प्रवेश करून ) ज्येष्ठ भ्रात्याचा जय असो. हे आर्य, त्या चितार्‍यानें आपल्या आज्ञेप्रमाणें ह्या पटावर रामचरित्राचीं चित्रें कढून आणलीं आहेत. हीं आपण पहावीं.

**राम०**—वत्सा लक्ष्मणा, हा चित्रपट त्वां वेळेवर आणिला. खिन्न झालेल्या सीतेच्या अंतःकरणास कसें रंजवावें हें तुला चांगलें ठाऊक आहे. बरें आण पाहूं. हें चरित्र कोठपावेतों काढलें आहे ?

**लक्ष्मण**—अग्नीमध्यें सीतादेवीची शुद्धि झाली एथपर्यंत.

**राम०**—हर हर काय गोष्ट झाली ही !

### आर्या.

ही जातींनें शुद्धा हिजला नलगेत पांवनें अन्यें ॥
तीर्थाला अग्नीला द्यावी कोणें पवित्रता धन्यें ॥ २० ॥

---

१ नाटकांत युवराजास कुमार म्हणतात.  २ पवित्र करणारीं.

हे यज्ञभूमि संभवे, जानकी, अग्निशुद्धीचा हा तुला लोकापवाद यावज्जीव लागणार आहे. पण रागावूं नको बरें. ( खिन्न होऊन ह्मणतो. )

श्लोक.

केष्टें जना कुलधनें अनुरंजवावें
जें मी दुरुक्त वदलों तुज तें नसावें ॥
जें नित्य सुंदर सुगंधि शिरीं धरावें ॥
तें पुष्प काय चतुरें चरणें चुरावें ॥ २१ ॥

सीता—असो तें प्राणनाथा, आतां काय त्याचें. तुमचें चरित्र चितान्यानें कसें काय काढलें आहे तें पाहूं या आपण. ( उठून पुढें सरते )

लक्ष्मण—हा पहा चित्रपट.

सीता—( निरखून पाहते. ) हे वरल्याआंगीं काढले आहेत हे कोण? हे जसे काय माझ्या प्राणनाथाची स्तुति करीत उभे राहिले आहेत.

लक्ष्म०—हे देवि हीं? सरहस्य जृंभकास्त्रें होत. प्रथम हीं कृशाश्वमुनीपासून विश्वामित्रऋषीस प्राप्त झालीं, त्यानें ताटकावधप्रसंगीं आमच्या आर्य रामचंद्रास कृपाकरून प्रसाद ह्मणून दिलीं.

राम०—हे जानकी, ह्या दिव्यास्त्रांस वंदन कर. हीं,

---

१ जनक ( सीरध्वज ) राजा जमीन नागराने खणून यज्ञ करितां भूमि तयार करीत असतां त्यास नागराच्या तासांत जानकी सांपडली म्हणून यज्ञ भूमि संभवे हें विशेषण दिलें. यावरून तिचे पावित्र्य हीं सुचविलें. संस्कृतांत नागराचे तासास सीता म्हणतात त्या तासांत ही सांपडली म्हणून हिचें हीं नाव सीता हें ठेविलें. ( वा० रा० बा० कां० सर्ग ६६ श्लोक १३ आणि १४ पहा ) २ जनाचे अनुरंजन करणें हें मोठें कठिण आहे. ३ योग्य नाहीं. ४ मंत्रविधानसहित. ५ जृंभकनामक अस्त्रें.

## ओंव्या.

पूर्वी ब्रह्मादिक अतिहर्षे ॥ ब्रह्महिताच्या उत्कर्षे ॥
तप करितां लोटलीं वर्षे ॥ सहस्रांचीं सहस्र ॥ २२ ॥
आनंदकाळतपाच्या अंतीं ॥ पुराणमुनी पाहती चित्तीं ॥
हींच देखिलीं अस्त्रमूर्ती ॥ तपोमय स्वतेजें ॥२३ ॥

**सीता**—ह्या अस्त्रदेवतांस माझा नमस्कार असो.

**राम०**—आतां हीं दिव्यास्त्रें सर्वप्रकारें तुझ्या संततीस उपतिष्ठतील.

**सीता**—हा मजवर अनुग्रहच आहे.

**लक्ष्म०**—आतां येथून पुढें हा मिथिलानगरींतील वृत्तांत आहे.

**सीता०**—( हर्षपावून. ) अहो ! नवीन फुललेल्या नीलकमलासारखा ज्याचा श्यामवर्ण आहे, स्निग्ध कोमळ आणि मांसल असा ज्याचा देह आहे, मामाजी विस्मित होऊन ज्याकडे प्रेमानें पहात आहेत, ज्यानें लीलेंकरून शिवधनुष्य भंगिलें आहे, आणि काकपक्षांनीं ज्याच्या मुखास फारच शोभा आली आहे, असा हा माझा प्राणनाथ येथें लिहिला आहे. असें दिसतें !

**लक्ष्म०**—हे आर्ये जानकी, इकडे पहा.

## दिंडी.

वसिष्ठादिक पातले घरा ज्याही ॥
तयां पूजी तव तात लैवलाहीं ॥
पहा गौतम जो शतानंद तो ही ॥
जनकरायाचा उपाध्याय पाहीं ॥ २४ ॥

---

१ ब्राम्हण रक्षणाच्या. २ पुष्ट. ३ दशरथ. ४ झुलपांनीं. ५आदरानें. ६ गौतम कुलांतला.

**राम०**—प्रिये, हें पाहिलेंना ? हें पहावयाजोगें आहे.

## आर्या.

कीं जनकरघुकुलांचा कोणा संबंध तो प्रिय असेना ॥
जेथें देता घेता कौशिकमुनि ज्यांत भेद गवसेना ॥ २५ ॥

**सीता**—हे तुह्मी चवघेही भाऊ त्याकाळीं केशखंडनरूप मंगलविधि संपादून विवाहदीक्षा घेऊन बसलां आहां. आणि मीही त्याच काळीं त्याचठिकाणीं जाणों आहे असें मला वाटतें.

**राम०**—मलाही असेंच वाटतें.

## श्लोक.

वाटे मला समय सुंदरि तो असे हा ॥
हस्तें तुझ्या पुरविली मम मानसेहा ॥
शोभे तसाचि धृतकंकण पाणि तो कीं ॥
भासे महोत्सवचि हा धृतमूर्ति लोकीं ॥ २६ ॥

**लक्ष्म०**—ही तूं आर्या जानकी, ही आर्या मांडवी, आणि ही वधूश्रुतकीर्ति.

**सीता**—लक्ष्मण भावोजी, आणि ही चवथी कोणहो !

**लक्ष्म०**—( लज्जित होऊन किंचित् हस्यकरून तोंड फिरवून हळूच म्हणतो हें ही ऊर्मिलेविषयीं मला विचारते. असो,

---

१ जेथें विश्वामित्रा सारखा दोहो ब्याह्यां कडे सारखा मान्य असा मध्यस्थ होता तेथें काय उणे असावयाचें. असे तात्पर्य. २ पहिला विवाहाचा समय तोचहा. ३ मनांतीलइच्छा. ४ हस्ततुझा ५ राम भरत हे लक्ष्मणापेक्षां वडील म्हणून वडील भावजयचें नांव घेतानां आर्या असें म्हटलें. हे बाई म्हणावें असें आहे. ६ भरताची स्त्री. ७ शत्रुघ्नाची स्त्री. शत्रुघ्न लक्ष्मणा पेक्षां लहान म्हणून लहान भावजयेचें नांव घेतानां वधू म्हणजे मुलगी असें म्हटलें. ८ चवथी कोण म्हणून लक्ष्मणाला त्याचे स्त्री विषयीं विचारते. हा सीतेनें लक्ष्मणाचा थोडा विनोद केला आहे. ९ लक्ष्मणस्त्री.

आतां दुसरें कांहीं दाखवितों. (उघडपणें.) आर्यें तें कशाला पाहिजे. पुढें पहावयाचें तें पहावें. हा भगवान् भार्गव परशुराम पाहिला काय?

सीता—( गडबडीनें ) ह्याला पाहून मला भय वाटतें.

राम०—हे ऋषे तुला नमस्कार असो.

लक्ष्म०—हे आर्यें, हाच भार्गवराम आमच्या रामचंद्रानें ( इतकें अर्धें[1] बोलतांच. )

राम०—( तिरस्कार करून. ) अरे तें असूंदे. अजून पुष्कळ पहावयाचें आहे. पुढें दाखीव.

सीता—( प्रीतीनें बहुमानपूर्वक रामाकडे पाहून ह्म० ) प्राणनाथा, ह्या विनयगुणानें आपण फारच शोभतां!

लक्ष्मण—आतां हे आपण अयोध्येस आलों, पहा.

राम—( डोळ्यांस पाणी आणून. ) हाय हाय, आठवतात, बरे ते दिवस मला वारंवार आठवतात.

साकी.

असतां तात[2] अह्मी जैं नूतन दार परिग्रह[3] केले ॥
चिंतिति[4] माता[5] सतत अह्मां ते[6] दिवस आमुचे गेले ॥ २७॥
( मनांत. ) ही जानकीही त्यावेळेस.

दिंड्या.

काय वर्णूं लावण्य जानकीचें ॥
कुटिल[7] कुंतल शोभती मस्तकींचे ॥

---

१ "रामचंद्रानें जिंकिला" असें बोलावयाचें तें "रामचंद्रानें" इतकें अर्धें बोलतांच. २ दशरथराजा. ३ विवाह. ४ कोठें ठेवूं आणि काय करूं असें करीत. ५ कौसल्यादिक. ६ ते आनंदाचे. ७ कुरळ. केश

कळ्या कुंदाच्या तसे दंत जीचे ॥
मुग्ध हंसणें पाहणें बाळपणचें ॥ २८ ॥
लाजवी जी स्वप्रभे चंद्रिकेतें ॥
दाखवी जी तैं सहज विभ्रमातें ॥
अशा पाहोनी मधुर अवयवांतें ॥
मनीं माता मानिती कौतुकातें ॥ २९ ॥

लक्ष्मण—ही मंथरादासी पाहिली काय ?

राम०—( उत्तर न करितां दुसरीकडे दृष्टि नेऊन ह्म० ) अगे जानकी, हें पहा.

आर्या.

जो शृंगवेरनगरीं हिंगणतरु तोच हा मला गमतो ॥
जेथें निषादपतिशीं स्निग्धाशीं जाहला समागम तो ॥ ३० ॥

लक्ष्म०—( हांसून मनांत ह्म० ) कायहो मध्यममाता कैकेयी हिची गोष्ट रामानें अगदींच गाळली !

सीता०—प्राणनाथा, तुह्मीं ह्याच ठिकाणीं जटा वळल्या, नाहीं बरें ?

लक्ष्म०—शिवशिव काय सांगावें ?

श्लोक.

टाकूनि पुत्रावरि राज्य सारें ॥
जें वृद्धइक्ष्वाकुनिं सद्विचारें ॥

---

१ बाळपणाच्या साभिप्रायपणाचें, उगीच निरभिप्रायक. २ चांदण्यातें. ३ साहजिक लीलेतें. ४ मनोहर. ५ ह्यास हल्लीं शिंग्रोर ह्मणतात. हें कोसलदेश आणि निषाद देश ह्यांच्या सीमेवर भागीरथीचे उत्तर तीरीं प्रयागाहून पश्चिमेस ६ कोसांवर आहे. ६ स्नेहयुक्त. ७ जें व्रत. ८ इक्ष्वाकु कुलांतील वृद्ध राजांनीं राजे वृद्ध झाल्यावर त्यांनी पुत्राला राज्यावर बसवून आपण वानप्रस्थ व्हावें अशी पूर्वीं चाल होती.

तें घेतलें बाळपणीं च रामें ॥
अरण्यवास व्रत पुण्य कामें ॥ ३१ ॥

सीता—ही भगवती भागीरथी. हिचें उदक किती स्वच्छ आणि पवित्र आहे ! माते तुला माझा नमस्कार असो.

राम॰—हे रघुकुलदेवते गंगे, तुला नमस्कार असो.

## ओंव्या.

सगरें अश्वमेध मांडिला ॥ भूमीवरी अश्व सोडिला ॥
तो अमरनाथें हिरोनि नेला ॥ निजपद जाईल या भयें ॥ ३२ ॥
तैं अश्व सोधावया धांवले ॥ ज्यांनीं पृथ्वीचे भाग भेदिले ॥
ते कपिलतेजें भस्म झाले ॥ स्वपित्याचे पूर्वजें ॥ ३३ ॥
ऐकोनियां ऐशीमात ॥ खडतर तप करी भगीरथ ॥
दुःखें सोशिलीं अगणित ॥ तुझ्या प्रसादाकारणें ॥ ३४ ॥
चिर दग्धांचिया देहांवरी ॥ माते पडतां तुझी लहरी ॥
तुझ्या प्रसादें उद्धार करी ॥ पूर्वजांचा भगीरथ ॥ ३५ ॥

अशी ती तूं आमची जननी होस, आणि ही सीता तुझी सून होय. हिचें कल्याण अरुंधतीप्रमाणें सदा इच्छीत जा.

---

१ नियम. २ हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय बाहुक राजाचा पुत्र हा आपले मातेच्या गर्भांत असतां तिच्या सवतीनीं तिला विष दिलें परंतु तिला कांहीं धक्का न होतां ती प्रसुत झाली पण पुत्र झाला तो विषयुक्त झाला म्हणून त्यास सगर ( गर-विष त्यासहित ) असें नांव दिलें. ( विष्णुपुराण ). ३ यज्ञ. ४ इंद्रानें. ५कपिलमहामुनीच्या दृष्टितेजानें. ६आपल्या पित्याचे म्हणजे दिलीपाचे. भगीरथ हा दिलीपाचा पुत्र. ह्याची सगरापासून वंशावळ अशी आहे—पहिला सगर त्याच्या केशिनी आणि सुमति अशा दोन स्त्रिया त्यांत केशिनीला असमंज नामें पुत्र झाला आणि सुमतीला ६०,००० पुत्र झाले. त्यांत असमंजाचा पुत्र अंशुमान्, त्याचा पुत्र दिलीप, आणि त्याचा पुत्र भगीरथ. ७ आजे—सुमतीचे ६०,००० पुत्र. ८ फार कठिण. ९ बहुकाळ दग्ध होऊन पडलेले.

**लक्ष्मण**—आर्या, स्मरण आहेना ? भरद्वाजऋषींनीं सांगितलेला चित्रकूट पर्वताच्या वाटेवरचा यमुनानदीच्या कांठीं जो श्यामनामक मोठा वटवृक्ष होता, तो हा.

**सीता**—प्राणनाथा, ह्या स्थलाचें स्मरण आपणास आहे कीं ?

**राम०**—सखे, मी कसा विसरेन बरें ? ज्या ठिकाणीं.

श्लोक.

अलसलुलित, मार्गीं चालतां श्रांत झालीं ॥
दृढतर परिरंभा देउनी सांवरीलीं ॥
मृदुलकमलतंतूतुल्य होतां त्वदंगें ॥
पडुनि त्वदयिं माझ्या घेतली झोंप संगें ॥ ३६ ॥

**लक्ष्मण**—एथून विंध्यारण्यास आरंभ झाला. येथेंच विराध राक्षसानें आपणास अडविलें होतें.

**सीता**—पुरे पुरे, नको हें पाहणें. आतां प्रभूनें आपले हातांत तालपत्राचें छत्र घेऊन दक्षिणारण्यांत प्रवेश केला, तेंच आपण पाहूं.

**राम०**—हीं वनें कोणतीं समजलींना ?

श्लोक.

जेथें मुनी नदितटीं जन जेंवि गेहीं ॥
वृक्षाश्रयें वसति तींच तपोवनें हीं ॥

---

१ भरद्वाज हा वाल्मीकीचा शिष्य. ह्याचा आश्रम प्रयागीं होता. राम शृंगवेरपुराहून येथें आला होता. २ हा पर्वत बुंदेलखंडांत बांदाजिल्ह्यांत बांदा शहरापासून आग्नेयीस सुमारें २५ कोसांवर आहे. ३ आळसानें विकळ. ४ आलिंगनास. ५ तुझे अवयव. ६ यमुनेच्या दक्षिण तीरापासून विंध्याचलापर्यंत जें अरण्य होतें तें. ७ विंध्यारण्याचे दक्षिणभागचें जें अरण्य तें. ८ घरीं.

नीवार[1] मुष्टिभरि पोंचित[2] जेथ होती ॥
सत्कारुनी अतिथि आपण सेवितातो ॥ ३७ ॥

**लक्ष्मण**—पहा येथें वृक्षांच्या दाटींतून गोदावरीनदीचा प्रवाह चालला आहे, तेणेंकरून ज्याच्या गुहा नादयुक्त होत आहेत, असा आणि ज्यांस निरंतर सजलमेघ आश्रयून राहिल्यामुळें ज्याची नीलकांति वृद्धिगत झाली आहे, असा हा जनस्थानांमधला[3] प्रस्रवणनामापर्वत[4].

**राम०**—सीते, हा पर्वत तुझ्या ओळखीचा असावा.

### पद.

आठवतें तुज काय सीते ॥ ध्रुवपद )
ह्याच गिरीवरी, आपण होतों ॥ पाहत निर्झर[5]
शोभा सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥ १ ॥
अपुलें मानस, स्वस्थ कराया ॥ लक्ष्मण फार-
झटे गे सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥ २ ॥
दिवस सुखानें, नेले येथें ॥ संगतिनें अनु[6]-
ज्याच्या सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥ ३ ॥
ह्या श्रीगोदा, वरिचें केलें ॥ स्नानें पानें सेवन-
सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥ ४ ॥
गोदावरिच्या, तीरीं आपण ॥ केले फार विहा[7]-
र सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥ ५ ॥

### दिंड्या.

एक दिवशीं आपूण एक शयनीं ॥
एकमेकांसी करीं आलिंगोनी ॥

---

१ तृणधान्य. २ शिजलेलें. ३ नाशिकाच्या आसपासच्या भागास जनस्थान हें नांव होतें. ४ हें त्र्यंबकेश्वर पर्वताचें प्राचीन नांव असावें. ५ जलप्रवाह. ६ बंधु लक्ष्मणाच्या. ७ क्रीडा.

काहीं काहीं बोलतां मंदवचनीं ॥
आंगि उठले रोमांच थरारोनी ॥ ३८ ॥
एकमेकांशीं लावुनियां आंगा ॥
गाल गालाशीं भूज भुजासंगा ॥
काढितां ही गोष्टिच्या प्रसंगा ॥
मनीं नाहीं आणिलें क्रम[1] भंगा ॥ ३९ ॥
असें होतां आनंद उभयतांतें ॥
रात्र सरली बोलतां बोलतां ते ॥
नाहिं झालें ठावकें आपणातें ॥
काय आठवतें सांग सखे तूतें ॥ ४० ॥

**लक्ष्मण**—ही पंचवटी, आणि तिजमधें पहा ही शूर्पणखा.

**सीता**—हाय हाय, प्राणनाथा, आतां हीच तुमची माझी भेट-नव्हे ?

**राम०**—अगे भित्रे, हें चित्र आहे. आतां ते वियोगाचें भय म-नांत आणूंनको.

**सीता**—कसेंही असो, पण दुर्जन आहेत ते दुःख देतात.

**राम०**—हरहर, ही जनस्थानांतली गोष्ट आतां वर्तमानकाळीं होत आहे असें वाटतें.

**लक्ष्म०**—( आपणासीं बोलतो. )

## साक्या.

कनकमृगाचें छेद्म[2] करुनि जें कर्म रांक्षसें[3] केलें ॥
संद्यःकृतसें[4] दुःखद होतें जरि तें गेलें गतलें ॥ ४१ ॥
शून्य[5]जनस्थानीं जीं केलीं प्रभुनें विलापचरितें[6] ॥
तीं ऐकुनि पाषाणहि रडती वज्रत्दृदय ही फुटतें ॥ ४२ ॥

---

१ गोष्टींच्या क्रमाला आणि भंगाला. २ मिष. ३ मारीचराक्षसानें. ४ आताचकेलेंसें. ५ निर्जन. ६ विलापकृत्यें.

**सीता**—( डोळ्यांस पाणीं आणून मनांत ह्मणते. ) हे रघुकुलभूषणा, प्राणनाथा, माझ्याकरतां तुला इतके क्लेश झालेना ?

**लक्ष्मण**—( रामचंद्राच्या नेत्रांतून अश्रु निघतात असें पाहून त्यास ह्मणतो. ) आर्या हें काय ?

**दिंड्या.**

बा[1]ष्पवारीचे बिंदु गळताती ॥
त्रु[2]टित मुक्तासर जेंवि ओघळती ॥
पडुनि धारा चहुंकडे पसरताती ॥
पहा सांचविलें तळें भुईवरती ॥ ४३ ॥
जरी रोधियले वेग[3] तुवां चित्तीं ॥
तरी दाटुनि बाहेर नीघताती ॥
ओष्ठ नासापुट मंद कांपताती ॥
लोक तेणें अनुमान करीताती ॥ ४४ ॥

**राम०**—वत्सा लक्ष्मणा, काय सांगूं ?

**श्लोक.**

त्या काळीं जो प्रिय[4]सखिवियोगेंचि जन्मास आला ॥
आशेनें जो श[5]मनविधिच्या क्रूर ही स[6]ह्य झाला ॥
तो दुःखाग्नी मज अनुभवा आज दु[7]र्वार येतो ॥
हृ[8]न्मर्मींचा व्रणकिण तसा वे[9]दना फार देतो ॥ ४५ ॥

**सीता**—हाय हाय, ह्याकाळीं प्राणपतीच्या वियोगानें दुःखित झालें असें मी मला पाहतें.

**लक्ष्म०**—( मनांत ह्मणतो. ) असो आतां ह्या उभयतांस दुसरें

---

१ नेत्रोदकाचे. २ तुटलेल्यापदरांतून जशीं मोतें ओघळतात. ३ दुःखाचे वेग. ४ सीतावियोगें. ५ शमनोपायाच्या. ६ सोसायाजोगा. ७ दुःसह. ८ हृदयांतील व्रणाचा घट्टा. ९ दुःख.

कांहीं दाखवावें. (चित्रपटाकडे पाहून उघडपणें ह्म०) ह्या मन्वंतरींचा पुरातन गृध्रराज जटायु, आपणास वडिलाप्रमाणें मान्य. ह्यानें ह्याच ठिकाणीं पराक्रम केला, रावणापासून सीता सोडविण्यास.

**सीता**—हा ताता गृध्रराजा[1], त्वां अपत्यस्नेह[2] शेवटास नेला खरा.

**राम०**—हा ताता, हा कश्यपसुता, हा गृध्रराजा, जटायो, तुझ्यासारख्या महान् तीर्थरूप[3] साधूचा लाभ आतां पुनः कोठचा होणार ?

**लक्ष्म०**—पहा, हा जनस्थानाच्या पश्चिमेकडचा चित्रकुंजवान्नामक दंडकारण्याचा भाग. येथेंच कबंध राक्षस राहत होता. हें ऋष्यमूकपर्वतावरील मतंगऋषीचें आश्रम स्थान. आणि हें येथें श्रवणानामक शिद्धशबरीचें स्थान. ह्याच्या पुढेंच हें पंपासरोवर.

**सीता**—हां, खरेंच, ह्याच ठिकाणीं प्रभूनें धैर्य सोडून कंठमोकळा करून रुदन केलें नव्हें ?

**राम०**—गे जानकी, हें पंपासरोवर फार रमणीय आहे.

श्लोक.

येथें जीं मंदकलहंस[4] पक्षवातें[4] ॥
कंपातें धरिति सनाल[5] तींच मातें ॥
बाष्पांच्या[6] परिपतनोद्गमांतरालीं ॥
पंपेचीं कमलवनें सुदृष्ट[7] झालीं ॥ ४६ ॥

**लक्ष्म०**—हा पहा आर्य[8] हनूमान्.

---

१ जटायो. २ मुलावरची ममता. ३ पवित्र. ४ मत्तकलहंस ह्यांच्या पंखांच्या वाऱ्यानें. ५ देठांसुद्धां. ६ अश्रूंचें पडणें आणि निघणें ह्याच्या मधल्या वेळेंत. ७ पाहण्यांस आलीं. ८ श्रेष्ठ.

**सीता**—हाच तो, चिरकाल दुःखांत पडलेल्या ह्या जीवाचा उद्धार करण्याविषयीं प्रयास करणारा भाग्यशाली मारुति.

**राम०**—हा तसाच आहे खरा.

### आर्या.

तो हा सुत अंजनिचा प्रतापशाली असा नसे अन्य ॥
ज्याच्या भुजवीर्यबळें आह्मांसह जाहली जगें धन्य ॥४७॥

**सीता**—वत्सा, ज्यावर प्रफुल्लित कदंबवृक्ष पाहून मयूर नृत्य करीत आहेत असो जो हा पर्वत दिसतो ह्याचें नांव काय बरें ? तेथें वृक्षाखालीं बसलेला ज्याची मुखश्री म्लान झाली आहे, व जो सामर्थ्यवैभवानें मात्र शोभणारा, आणि जो मुहूर्तमात्र मूर्छित झाल्यामुळें त्वां रुदन करीत सांवरून धरिला असा हा प्राणनाथ येथें काढला आहे. असें दिसतें.

**लक्ष्मण**—सांगतों ऐक.

### श्लोक.

तो हा आहे कुसुमित[1] गिरी माल्यवान् नाम ज्याला ॥
ज्याच्या शृंगीं[2] सतत वसते नूतना मेघमाला[3] ॥

**राम०**—( हें ऐकून ह्म० )
वत्सा आतां विरम[4] न पुढें पाहवे, तोच योग[5] ॥
आला वाटे फिरुनि मज तो जानकीचा वियोग ॥ ४८ ॥

**लक्ष्मण**—ह्यापुढें आपलीं, तशींच मोठमोठ्या वानरांचीं आणि राक्षसांची आश्चर्यकारक अशीं कर्मै पुष्कळ पाहावयाजोगीं आहेत. परंतु ही जानकी पाहतां पाहतां थकली आहे, ह्यास्तव मी विनंती करितों कीं, आज आतां पाहणें पुरें करावें.

---

१ फुलांनीं युक्त पर्वत. २ शिखरावर. ३ मेघसमूह. ४ थांब. ५ प्रसंग.

सीता—प्राणनाथा, ह्या चित्रदर्शनानें मला एक डोहळा झाला आहे. ह्यासाठीं माझी एक प्रार्थना आपणास आहे.

राम०—सखे, प्रार्थना असें कां ह्मणतेस. काय ती आज्ञा कर ह्मणजे झालें.

सीता—असें कसें होईल. म्यां आपणास प्रार्थनाच करावी. ती हीच कीं, गंभीर आणि रमणीय अशा [१]वनराजींत जाऊन पुन्हा विहार करावा, आणि भागीरथीच्या पवित्र शीतळ उदकांत स्नानें करावीं असें मला वाटतें.

राम०—फार चांगलें आहे—वत्सा लक्ष्मणा.

लक्ष्मण—हा मी जवळच आहें. काय आज्ञा ?

राम०—अरे, जानकीस डोहळा झाला असतां तो तत्काळ पुरवावा अशी गुरुजनांची नुकतीच आज्ञा झाली आहे, तर जानकीस सांप्रत [२]वनविहाराचा डोहळा झाला आहे, तो पुरविला पाहिजे. ह्यासाठीं [३]अस्खलित चालणारा आणि ज्यांत बसलें असतां सुख होईल असा एक रथ सिद्ध करून लौकर घेऊन ये.

लक्ष्म०—आज्ञा महाराज. हा आणला रथ ह्मणा. ( असें ह्मणून निघून जातो. )

सीता—प्राणनाथ, आपणही तिकडे चलावें.

राम०—अगे कठिणह्रदये जानकी, हें काय मला सांगावें लागतें ? आल्याशिवाय माझ्यानें राहवेल असें तुला वाटतें कायगे ?

सीता—तर मग माझें फारच प्रिय होईल.

राम०—हे प्राणसखी जानकी, लक्ष्मण रथ आणी तोंपर्यंत दोन घटका आपण खिडकीपाशीं वाऱ्यावर बसूं.

---

१ वृक्षयुक्त अरण्यांत. २ वनक्रीडेचा.. ३ अडखळल्यावांचून.

**सीता**—होहो असेंच करावें. चित्रें पाहण्याच्या परिश्रमामुळें झोंपेनें मला फार घेरलें आहे.

**राम०**—तर मग ये आणि माझ्या मांडीवर उसें ठेवून अमळ स्वस्थ झोंप घे. अथवा.

## आर्या.

घालीं गळ्यांत माझ्या सखि हा श्रमघर्मबिंदुयुत गार ॥
बाहु तुझा चंद्रकर स्त्रावि गमो चंद्रकांतमणिहार ॥ ४९ ॥

**राम०**—( सीतेचा बाहू आपल्या कंठावर ठेवून अतिशयित आनंद पावून ह्मणतो. ) प्रिये, मला असें हें काय होतें बरें.

## श्लोक.

कळेना हें मातें सकळ सुख कीं दुःखचि असे ॥
असे निद्रा किंवा मद, विषें चढे, मोहचि वसे ॥
तुझ्या स्पर्शीं स्पर्शीं विकळ करितो इंद्रियगणा ॥
विकारें प्राणांतें भ्रमहि अणि देई स्थिरपणा ॥ ५० ॥

**सीता**—( हास्य करून ह्मणते. ) तुमची कृपा आणि प्रीति मजवर पूर्ण आहे, त्याचें हें लक्षण. दुसरें कांहीं नाहीं.

**राम०**—प्राणसखे, किती गे तुझें मधुरभाषण हें ?

## श्लोक.

म्लानास जीवकुसुमास फुलीवणारीं ॥
सर्वेंद्रियांस सुखवून हि मोहणारीं ॥
ऐसीं तुझीं सुवचनें कमलायताक्षी ॥
कर्णांस गोड गमती मन यास साक्षी ॥ ५१ ॥

---

१ श्रमघर्माच्या बिंदूंनीं युक्त. अतएव गार थंड असा तुझा बाहू. २ चंद्रकिरणांनीं स्त्रवणारा चंद्रकांतमण्याचा हारच वाटो. ३ मद चढला कीं विषचढलें. ४ व्यापारहीन. ५ इंद्रियसमुदायास. ६ त्हृदयास विलक्षण विकार झालातो. ७ देहभान. ८ सुकलेल्यास. ९ जीवरूपपुष्पास. १० कमलपत्राक्षी.

सीता—अहो प्रियंवद, या, आतां आपण शयन करूं. ( शयनार्थ कांहीं साधन इकडे तिकडे पाहते. )

राम॰—दुसरें सोधावयास कशास पाहिजे ?

श्लोक.

लग्नापासुन वर्तमानसमयापर्यंत गेहीं वनीं ॥
रात्रीं वा दिवसासही शिशुपणीं तैसा पुन्हा यौवनीं ॥
निद्रेला तव रामबाहुच उशी हा सर्वदा जाहला ॥
जाग्रत्स्वप्नसुषुप्तियांत न दुजा स्पर्श प्रिये याजला ॥५२॥

सीता—खरें आहे. ( असें ह्मणून रामाच्या बाहूवर मस्तक ठेवून निजते. ) आहे आहे प्राणप्रिया हें आहे.

( असें चावळत झोंपीं जाते. )

राम॰—काय ही प्रियसखी माझ्या आंगावरच झोंपीं गेली !

( तिजकडे पाहून. )

श्लोक.

गृहाची ही शोभा तसि अमृतवर्तीच नयना ॥
असे ही श्रीखंडापरिस सुखदस्पर्श ललना ॥
हिचा कंठीं बाहू मृदु शिशिर मुक्तासुसर हा ॥
हिचें सारें आहे प्रिय परि न साहेंचि विरहा ॥ ५३ ॥

( इतक्यांत द्वारपालिका येते. )

द्वारपालिका—महाराज, तो आला.

राम॰—अगे कोण ?

द्वारपा॰—महाराजांचा परिचारक दुर्मुख.

राम॰—( मनांत ह्मं॰ ) हां अंतःपुरचारी दुर्मुख काय ? तो

१ अमृताचीवात—शलाका. २ चंदनापेक्षां. ३ सुंदरी. ४ मऊ. ५ शीतळ. ६ मोत्यांचा हार. ७ पर्वोक्त विरह अशी भ्रांति होते.

मीं लोकवार्ता जाण्यासाठीं पाठविला होता खरा. तो आला असेल. मी भलतेंच समजलों. ( उघडपणें. ) बरें त्याला आंत येऊंदे.

( द्वारपालिका जाते. आणि दुर्मुख येतो. )

**दुर्मुख**—( आपणाशीं बोलतो. ) हायहाय, सीतादेवीविषयींचा अनिर्वाच्य जनापवाद महाराजांस कसा सांगूं ? अथवा, मजमंदभाग्याचें कामच हें. नसांगून काय करावें ! सांगणें कपाळास आलें खरें.

**सीता**—( झोंपेत चावळते. ) हे प्राणप्रिया. तूं कोठें आहेस ?

**राम०**—अहो मला दुःखशोक देणारी जी विरहव्यथा तीच चित्रदर्शनानें ह्या माझ्या प्रियसखीस झाली ह्मणून ही झोंपेंत असें बरळते काय ? ( मायेनें सीतेच्या आंगावरून हात फिरवून ह्मणतो. )

## ओंव्या.

तीन्ही[1] अवस्थांमाजी साचें ॥ झालें अद्वैत[2] सुखदुःखाचें ॥
एक रूप उभयतांचें ॥ जें स्नेहाशीं अनुरूप ॥ ५४ ॥
जें त्द्दया विश्रांति स्थान ॥ जेथें प्रेमरसाचें मान ॥
कधींही होईना न्यून ॥ वयोभेद[3] झाला तरी ॥ ५५ ॥
मध्यें आलिया आवरण[4] ॥ कालेंकरून त्याचें निवारण ॥
होतां पहिल्यापरी पूर्ण ॥ स्नेहसत्वीं जें राहिलें ॥ ५६ ॥
ऐशियां सुमाणुसासी ॥ असावी सर्वदा भद्रराशी[5] ॥
कोण तयाच्या अभद्राशी ॥ जन मानसीं चिंतील ॥ ५७ ॥

**दुर्मुख**—( जवळ जाऊन. ) महाराजांचा जय असो.

**राम०**—आज नवीन वार्ता कोणती ऐकिली सांग.

---

१ जागृतिस्वप्नसुषुप्ति. २ साम्य. ३ बाल्यतारुण्यादि. ४ विघ्न. ५ कल्याण.

**दुर्मुख**—नगरांतील व देशांतील सर्वलोक महाराजाची स्तुति करतात, कीं ह्या रामचंद्रानें दशरथराजाचें विस्मरण पाडलें.

**राम॰**—हा उगीच अर्थवाद[1] आहे. ह्या स्तुतींत कांहीं नाहीं. लोकांच्या बोलण्यांत मजविषयीं कांहीं दोषोक्ति निघाली असली तर ती सांग. कांकीं, तिचें परिमार्जन केलें पाहिजे.

**दुर्मुख**—( डोळ्यांस पाणी आणून ) आज्ञा होते त्यापक्षीं सांगतों, ऐकावें. ( कानाजवळ तोंड नेऊन, ) यायाप्रमाणें वर्तमान आहे.

**राम॰**—हायहाय. ( असें बोलून मूर्छा पावतो. )

**दुर्मुख**—महाराज, सावध व्हा. अविचारी लोकांच्या बोलण्यावर जाऊं नका.

**राम॰**—सावध होऊन ह्मणतो.

## साक्या.

वैदेहीला[2] कसा तरी परसदनीं[3] निवास घडला ॥
होइल दूषण जनांत हा मज धाक मानसीं पडला ॥ ५८ ॥
त्या दोषाच्या परिहारा म्यां अद्भुत उपाय केले ॥
दुर्दैवानें माझ्या सारे ते विलयाप्रति[4] नेले ॥ ५९ ॥
कीं तें दूषण जनांत साऱ्या तेणें[5] विस्तृत केलें ॥
पिसाळल्या श्वानाचें विषसें पुनरपि कसें उदेलें ॥ ६० ॥
काय करावें न सुचे मजला आतां उपाय कांहीं ॥
जीवित्वाला धिक्कार असो मद्गति वरवी नाहीं ॥ ६१ ॥

( विचारकरून करुणायुक्त होऊन ह्मणतो ).

अथवा दुसरें काय ? हेंच केलें पाहिजे.

---

१ स्तुतिवाद. २ सीतेला. ३ रावणाच्याघरीं. ४ व्यर्थ केले. ५ दुर्दैवानें.

### आर्या.

जनरंजन केसें तारी साधावें हेंचि योग्य संतातें ॥
प्राणातें मातें ही सोडुनि जें साधिलेंचि मैत्तातें ॥ ६१ ॥

वसिष्ठगुरूंनीं हेंच सांगून पाठविलें आहेना ? आणखी सांगतों. असें जर मी नकरीन तर.

### श्लोक.

अजवरि भुवनीं जें सूर्यवंशोद्भवांनीं ॥
विमळ चरित केलें लोकमान्या नृपांनीं ॥
जनमुखिं मम योगें डाग लागेल त्यातें ॥
जरि तरि अजि लोकीं धिक् अधन्यास मातें ॥६३॥

हा प्रियसखी जानकी, जी तूं यज्ञवेदीपासून उत्पन्न होणारी, आपल्याजन्मानें पृथ्वीस पवित्र करणारी, निमिजनक वंशास आनंद देणारी, पावक, वसिष्ठ, अरुंधती ह्यांनीं प्रशंसावया जोगेंशील बाळगणारी, सर्वप्रकारें मजवर प्राण ठेवणारी, वनवासांत मला सुख देणारी, आणि थोडें असून गोड बोलणारी, त्या तुझा ह्या प्रकारचा परिणाम कसागे झाला ! हायहाय!

### ओंव्या.

तुझ्यामुळें हीं जगतें ॥ झालीं असती पुण्यवंतें ॥
तुजविषयीं जनाचीं उक्तें॥ अभद्र कैशीं निघालीं ॥ ६४ ॥
तुझिया योगें झाले सनाथ ॥ सर्व लोक असती स्वस्थ ॥
ती तूं होऊन अनाथ॥ आतांचि विपत्ती भोगिशील कीं॥६५॥

अरे दुर्मुखा, जा लक्ष्मणास जाऊन सांग कीं, तुझा नवीन राजा जो राम तो तुला आज्ञा करितो. ( कानांत ) याया प्रमाणें लौकर कर.

---

१ थोरातें. २ दशरथानें. ३ दुष्टवार्तेचीं.

**दुर्मुख**—महाराज, हें काय बोलतां ? अहो, जी अग्नींतून शुद्ध होऊन निघाली, जिच्या उदरांत रघुवंशाचा अंकुर असा पवित्र गर्भ स्फुरण पावत आहे, त्या देवीविषयीं दुर्जनांच्या असमंजस भाषणावरून आपण थोरांनीं हें अयोग्य कर्म आरंभिलें. हें नीट वाटत नाहीं.

**राम०**—शिवशिव, अरे लोकांस दुर्जन असें कां ह्मणतोस ?

श्लोक.

इक्ष्वाकुवंशांत जनास भोळें ॥
बोलावया कारण हेंच झालें ॥
शुध्यर्थ जें अद्भुत कर्म केलें ॥
तें कोण मानील खरें दुरेलें ॥ ६६ ॥

यासाठीं तूं जा आणि लक्ष्मणाला याप्रमाणें सांग.

**दुर्मुख**—हायरे दैवा, हा देवी जानकी, आतां तुझी काय गती होईल ?

( असें बोलून निघून जातो. )

**राम०**—हाय हाय, आज मी केवढा क्रूरकर्मा आणि घातकी झालों हा. पहा.

श्लोक.

बाल्यापासुनि पोशिली प्रियसखी देऊनि त्या त्या प्रिया ॥
अन्याला जरि भिन्नदेह दिसती जी एकचित्ता प्रिया ॥
तीतें छद्म करूनि आज सहसा मी मृत्युला देतसें ॥
जैसा खाटिक पाळिल्या बकरिचा कापी गळा हें तसें ॥६७॥

---

१ अविचाराचें. २ माझ्या दुर्दैवानें. ३ अग्निशुध्यादिक. ४ अतिदूरचें. ५ लहानपणापासून. ६ प्रियपदार्थ. ७ स्त्री. ८ कपटानें. ९ काळाला. १० हें कर्म तसें आहे.

तस्मात् स्पर्शकरण्यास अयोग्य असा मी महापातकी ह्या देवीला आपल्या स्पर्शानें दूषित कशाला करूं? ( असें ह्मणून सीतेचा मस्तक हळूच उचलून आपला हात काढून घेतो. आणि ह्मणतो.

आर्या.

गे मी अपूर्वकर्मं चांडाल चि सोड मज कळे न तुला ॥
शिवलीस चंदनाच्या भ्रांतीनें दुर्विपाकविषतरुला ॥ ६८ ॥

पद

सोड सोड सोड अतां जानकी मला ॥ ध्रु० ॥
आज कर्म चांडाळ हाच जाहला ॥ नसेल
आजवरी असा कोणि पाहिला ॥ सोड० ॥ १ ॥
भ्रांति धरुनि चंदनाची शीवलिस मला ॥
स्पष्ट दुष्ट परिणामीं विषतरु तुला ॥ सोड० ॥ २ ॥
मजवरि विश्वास तुवां फार ठेविला ॥
मीच आज खरा तुझा गळा कापिला ॥ सोड० ॥ ३ ॥

( उभा राहून ह्मणतो. )

पद ७०.

न कळे होइल गति कैशी ॥ आतां काय करूं ॥ ध्रु० ॥
विपरित काळाचें लक्षण ॥ झाला जीव लोकनिर्वाण ॥
सरलें जगण्याचें कारण ॥ आतां प्राण केंवि धरूं ॥ १ ॥
भासे मजला जग हें शून्य ॥ दिसतें जैसें जीर्ण अरण्य ॥
सरलें माझें सर्वहि पुण्य ॥ होउनि वन्य काय फिरूं ॥ २ ॥
पूर्वी मानवला संसार ॥ वाटे आतां तोच असार ॥
शरिरीं होती कष्टहि फार ॥ नाहिं अधार कुठे शिरूं ॥ ३

१ दुष्टपरिणामी. २ जीवित्वाचा अंत. ३ ओस. ४ ओसाड रान. ५ वनवासी.

सीतेवांचुनि मजला क्षण ॥ होतिल कल्पासमान जाण ॥
वाटति सोडावे हे प्राण ॥ खोंचुनि बाण काय मरूं ॥ ४ ॥
न कळे होइल गति कैशी ॥ आतां काय करूं ॥

अथवा प्राण सोडूं ह्मटलें तरी जावयाचे नाहींत.

## आर्या.

भोगावयास दुःखें दैवें चैतन्य ठेविलें रामीं ॥
तें सुदृढ प्राणांहीं खिळिलें ऐसें च मानितों हा मी ॥ ७१ ॥

( देवता गुरु इत्यादिकांची प्रार्थना करतो. )

## ओंव्या.

हा भगवंता विश्वामित्रा ॥ हा वसिष्ठा सद्गुणपात्रा ॥
हा श्री[१] पावका पवित्रा ॥ धांवा तुह्मी यां वेळीं ॥ ७२ ॥
हा माते अरुंधती ॥ सीताजननि ये वसुमती[२] ॥
हा त्रिजटे महामती ॥ कृपा करावी या वेळीं ॥ ७३ ॥
हा बिभीषणा लंकेश्वरा ॥ हा हनुमंता महावीरा ॥
पार नसे तुमच्या उपकारा ॥ हा प्रियसखे सुग्रीवा ॥ ७४ ॥
हा जनका मिथिलापाळा ॥ हा मम ताता[३] स्नेहाळा ॥
हा मातांनो[४] या बाळा ॥ कृपा दृष्टीनें पहावें ॥ ७५ ॥
वंचक[५] होऊन तुह्मांतें ॥ वंचिता झालों सर्वांतें ॥
कृपा करुनि यां मातें ॥ सांभाळावें या काळीं ॥ ७६ ॥

अथवा ह्या समयीं मी त्यांना हाक मारण्यास ही अयोग्य आहें. कां कीं.

## आर्या.

कीं ते धन्य महात्मे मी दुष्ट कृतघ्न मित्र सापाचा ॥
घेतां नामें त्यांचीं होईल विटाळ त्यांस पापाचा ॥ ७७ ॥

---

१ हे अग्ने. २ हे पृथ्वी. ३ हे दशरथा. ४ कौसल्या कैकेयी सुमित्रांनो. ५ ठक.

जोगी. पद ७८.

जन्मुनि रविवंशीं ऐसा ॥ झालों निर्दय मी कैसा ॥ ध्रु० ॥
चित्तीं ठेवुनियां विश्वास ॥ माझ्या अवलंबुनि ऱ्हदयास ॥
निजली पाहुनियां चित्रास ॥ झाला जिला फार आयास ॥
तिजला सोडितसें सहसा॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ १ ॥
सर्वथा उचित जिचा अत्याग ॥ तीचा करित असें मी त्याग ॥
जीवर नित्य करीं अनुराग ॥ तिजवर झाडितसें मी आग ॥
काढितों जळामधुनि मासा ॥ झालों निर्दय मी कैसा ॥ २ ॥
जी ही शोभा सदनाची ॥ मूर्ती केवळ मदनाची ॥
विश्रांती मम ऱ्हदयाची ॥ माझी प्राण सखी साची ॥
तिजला घालितसें फांसा ॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ ३ ॥
जीच्या उदरीं गर्भ कठोर ॥ होतो चंचळ वारंवार ॥
नुचले निजगर्भाचाभार ॥ जीचे अवयव अतिसुकुमार ॥
तिजला देतों मी कुदशा ॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ ४ ॥
द्यावा बळी राक्षसाला ॥ तैसा टाकितसें हिजला ॥
नाहीं लाज दया मजला ॥ कराया कर्म असें सजला ॥
झाला नसे कोणि ऐसा ॥ झालों निर्दय मी कैसा० ॥ ५ ॥

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो. )

अनर्थ अनर्थ काय हा अनर्थ.

राम०—अरे पहा पहा काय आहे तें.

( पुन्हा शब्द होतो. )

श्लोक.

रवि सुतातटीं राहती मुनी ॥
करिति उग्र जे तप निंशीदिनी ॥

---

१ पूर्ण. २ यमुनातीरीं. ३ रात्रदिवस.

लवणराक्षसें त्रास दीधले ॥
ह्मणुनि तूज हे शरण पातले ॥ ७९ ॥

राम०—काय, अद्यापि पृथ्वीवर राक्षसांचा त्रास आहे ? असो, त्या दुरात्म्या कुंभीनसी पुत्राचा[1] निःपात करण्यास शत्रुघ्नाला पाठवितों. (कितीएक पावलें पुढें जाऊन पुन्हा माघारा येतो.) हे प्राणसखी जानकी, आतां तुझी कशी गति होईल नकळे. हे भगवति वसुंधरे[2] ही बिचारी तुझी कन्या जानकी हिजकडे पहा.

## आर्या.

विश्वंभरे क्षमे[3] या जानकिला रक्ष निरविली[4] तुजला ॥
कन्या तुझीच आहे बोलाया हें नसेचि लाज मला ॥ ८० ॥

## आर्या.

जनकरघुकुलांचें ॥ [5]हें मंगल कीं वंश धन्य हा केला ॥
तूं प्रसवलीस हिजला पुण्यमखीं[6] [7]देवि पुण्यशीलेला ॥ ८१ ॥

( असें बोलून राम निघून जातो. )

सीता—( प्रथम झोंपेंत असतां बोलते. ) हे सौम्या, हे प्राणप्रिया, कोठें आहेस ? ( अकस्मात उठून बसते. ) हाय हाय दुष्ट स्वप्नानें मला भ्रांतींत पाडलें, आणि उगीच मी प्राणप्रियाला हाका मारितें ! (सावध होऊन इकडे तिकडे पाहते.) हाय हाय, मी निजलें असतां मला एकटीला टाकून माझा प्राणनाथ निघून गेला काय ? यासमयीं हें असें कसें झालें ? असो, आतां तो माझे दृष्टीस पडला ह्मणजे मी त्यावर रुसेन. ( मनांत विचार करून ह्मणते. ) पण जर माझ्यानें तसें करवेल

---

१ लवणासुराचा. २ हे पृथ्वी. ३ हे पृथ्वी माते. ४ स्वाधीन केली. ५ सीतारूप. ६ यज्ञांत. ७ पवित्र जानकीला

तर. ( मोठ्यानें ह्मणते. ) कोण आहे तिकडे ! कोणी [१]परिचारक आहे काय ? ( कोणी हाक देत नाहीं. )

दिंड्या.

असे कोठें तो प्राणनाथ माझा ॥
दाखवा हो त्वकरी रघूराजा ॥ ८२ ॥
कसा गेला टाकूनि एकटीला ॥
शीर अंकीं ठेवून नीजलीला ॥ ८३ ॥
काय कारण जाहलें जावयाला ॥
कोण आलें हो त्यास न्यावयाला ॥ ८४ ॥
तुझ्या संगें येईन मी वनांत ॥
बोलिला जें तें नाहिं का मनांत ॥ ८५ ॥
स्वप्न आतां तैसाच मज झाला ॥
प्राणनाथ टाकूनि मला गेला ॥ ८६ ॥
हाक मारित फीरतें प्राणनाथा ॥
येइं येईं सत्वरी जगन्नाथा ॥ ८७ ॥
तेंच झालें कीं खरें हा कपाळा ॥
कुठें पाहूं मी प्रिया जगत्पाळा ॥ ८८ ॥
असो आतां पाहीन त्यास जेव्हां ॥
त्याजवर मी होईन रुष्ट तेव्हां ॥ ८९ ॥

( पुन्हा हाका मारते. ) कोणी [१]परिजन तिकडे आहे काय ? ( इतक्यांत दुर्मुख येतो. )

**दुर्मुख**—( झटकन पुढें होऊन ) हे देवी जानकी, कुमार लक्ष्मण विनंती करतो, कीं, हा रथ सिद्ध करून आणला आहे. आपण येऊन रथावर बसावें ?

---

१ सेवक.

**सीता०**—ही मी बसावयास आलें पहा. पण माझ्या उदरांतील गर्भ फार चंचळ होत आहे, त्याचा भार मला साहत नाहीं याजकरितां हळूहळू येतें.

**दुर्मुख**—आईसाहेब, असें इकडे यावें. हा रथ आहे यावर बसावें.

**सीता**—( रथांत बसताना. ) आतां ऋषिमंडळीस माझा नमस्कार असो; रघुकुल देवतांस माझा नमस्कार असो; प्राणनाथाच्या चरणकमलास माझा नमस्कार असो; आणि सकल गुरुजनांस ही माझा नमस्कार असो.

( असें ह्मणून सर्व निघून जातात. )

( चित्रदर्शननाम प्रथम अंकः )

( समाप्त. )

# उत्तररामचरित्र नाटक.

## अंक २.

स्थल.

दंडकारण्य.

पात्रें.

| | |
|---|---|
| वासंती | वनदेवता. |
| आत्रेयी | तापसी. |
| रामचंद्र. | अयोध्याधिपति. |
| शंबूक | शूद्रतपस्वी. |

( पडद्यापलीकडे शब्द होतो. ) यावें, तपस्विनी, यावें

( इतक्यांत पांथाचा वेष धरून एक तापसी येते. )

**तापसी**—अहो ही वनदेवता, फलपुष्पपल्लवयुक्त अर्घ्यपात्र घेऊन माझी पूजा करण्याकरितां येत आहे.

**वनदेवता**—( अर्घ्यपात्र घेऊन येते, आणि तापसीला अर्घ्य समर्पून ह्मणते. )

श्लोक.

तुझें सारें आहे वन, सुदिन मातें उगवला ॥
सतांचा संतांशीं परम गुरुं संग घडला ॥

तरुछाया पाणी मुनिस [1]अशनायोग्य असती ॥
फलें मूलें जीं जीं सकलहि [2]पराधीन नसती ॥ १ ॥

**तापसी**—तें काय बोलावयाचें ? खरेंच आहे.

श्लोक.

सदा प्रीती चित्तीं [3]विनयमधुरा वाणि हि सदा ॥
स्वभावें [4]कल्याणी मति परिचया [6]भेद न कदा ॥
पुढें किंवा मागें मनिं [5]रसविपर्यास नसती ॥
[7]रहस्यें साधूंचीं [8]अकपट [9]विशुद्धें च असती ॥ २ ॥

**वनदे०**—आपण कोण, आपलें नांव काय हें मला समजेल तर चांगलें होईल.

**तापसी**—मला आत्रेयी, ह्मणतात.

**वनदे०**—हे आत्रेयी, कोणीकडून आपलें येणें झालें ? आणि ह्या दंडकारण्यांत येण्याचा हेतु कोणता ?

**आत्रेयी**—सांगतें ऐक. कोठून कशासाठीं आलें तें.

श्लोक.

येथें अगस्त्यादिक जे महर्षी ॥
वेदांतवेत्ते वसतात हर्षी ॥
त्यांपाशि वेदांत शिकावयाला ॥
वाल्मीकिपासूनच या [10]वनाला ॥ ३ ॥

**वनदे०**—हें मोठेंच आश्चर्य. अगे, जो वाल्मीकिऋषि ब्रह्मवेत्ता पुराणमुनि, आणि मोठे मोठे ऋषि ब्रह्मज्ञान सामर्थ्य ज्याची

---

१ भक्षणास. २ तुझ्याच स्वाधीन आहेत. ३ विनययुक्त असून गोड. ४ चांगली. ५ पालट. ६ प्रीतींत अंतर. ७ अंतरंगगोष्टी. ८ निष्कपट. ९ एकरूप. १० या वनाला आलें, असा अर्थ.

उपासना करतात, त्याला सोडून त्वां इतकें लांब येण्याचा श्रम कशासाठीं घेतला बरें ?

**आत्रेयी**-काय करावें बाई, तेथें आमच्या अध्ययनास मोठी अडचण प्राप्त झाली ह्मणून इतक्या लांबचा प्रवास करणें प्राप्त झालें.

**वनदे॰**—अशी कोणती अडचण आली बरें ?

**आत्रेयी**—कोणी एके देवतेनें, सर्व प्रकारांनीं अद्भुत आणि नुकतेंच ज्यांचें स्तनपान सुटलें अशावयाचीं दोन मुलें त्या वाल्मीकिमुनीला आणून दिलीं. तीं केवळ ऋषीच्याच नाहीं, पण सचराचर भूतांच्या अंतःकरणांत स्नेह उत्पन्न करणारीं अशीं आहेत.

**वनदे॰**—त्यांचीं नांवें ठाऊक आहेत काय ?

**आत्रेयी**—त्याच देवतेनें त्यांचीं कुश आणि लव हीं नांवें सांगून त्यांचा प्रभाव ही सांगितला.

**वनदे॰**—त्यांचा कोणत्या प्रकारचा प्रभाव सांगितला बरें ?

**आत्रेयी**—त्यांस सरहस्य जृंभकास्त्रें जन्मतः सिद्ध आहेत ह्मणून सांगितलें.

**वनदे॰**—हा मोठाच चमत्कार.

**आत्रेयी**—ते दोन्ही मुलगे वाल्मीकिऋषीनें स्वतां दाईपणा करून पोषिले, आणि रक्षिले. त्यांचें चौलकर्म केल्यावर वेदत्रयीवर्जून शस्त्रास्त्रशास्त्रविद्येंत निपुण केलें. पुढें त्यांस अकरावें वर्ष लागलें. तेव्हां आपण गुरु होऊन क्षत्रियांच्या विधीप्रमाणें त्यांचीं उपनयनें केलीं. आणि वेदत्रयीचें अध्ययन त्यांजकडून करविलें. त्या मुलांची बुद्धि आणि धारणा अप्रतिम[1] लोकविलक्षण, ह्या मुळें त्यांजबरोबर आमचा अध्ययन करण्याचा लाग चालेना.

---

१ अनुपम.

## श्लोक.

गुरू विद्या प्राज्ञा जसि तसिच अज्ञाहि[1] वितरी[2] ॥
तयांची धीशक्ती[3] अधिक अथवा न्यून न करी ॥
तथापी दोघांच्या बहुतचि फलीं भेद दिसतो ॥
जसा बिंबग्राही[4] शुचिमणि[5] तसा लोष्ठ[6] नसतो ॥ ४ ॥

**वनदे०**—हीच काय अध्ययनाला अडचण ?

**आत्रेयी**—दुसरी एक अडचण आली.

**वनदे०**—दुसरी अडचण ती कोणती ?

**आत्रेयी**—दुसरी अडचण अशी उत्पन्न झाली कीं, एकें दिवशीं वाल्मीकिऋषि माध्यान्हिककर्म करण्याकरितां तमसानदीच्या तीरीं गेला होता. तेथें क्रौंच पक्ष्यांचा एक जोडा वि[7]हार करीत असतां त्यांतून एक पक्षी व्याधानें मारिला, असें त्यानें पाहिलें. तेव्हां त्या ऋषीच्या मुखांतून अकस्मात् बत्तीस अक्षरांची छंदोबद्ध अशी वाणी निघाली ती अशी.

"न पावसि निषादा तूं प्रतिष्ठा[8] काळ शाश्वत[9] ॥
कीं क्रौंच [10]मिथुनीं एक वधिला कामोहित[11]" ॥

**वनदे०**—वेदवाणींत छंद प्रसिद्ध आहेत. लौकिक वाणींत छंदानें हा नवाच अवतार घेतला वाटतें. हा मोठा चमत्कारच आहे.

**आत्रेयी**—त्याचसमयीं पितामह ब्रह्मदेव, ज्याच्या मुखापासून शब्दब्रह्माचा आविर्भाव झाला, अशा त्या वाल्मीकिऋषीच्या जवळ प्रगट होऊन त्यास ह्मणाला, हे ऋषे, तूं शब्दब्रह्मामध्यें नि[12]ष्णात झालास. यास्तव रामचरित्राचें व-

---

१ जडमतीला. २ देतो. ३ बुद्धिशक्ति. ४ प्रतिबिंब घेणारा. ५ हिरा. ६ ढेंकूळ. ७ क्रीडा. ८ उत्तमगति. ९ अखंड. १० क्रौंचपक्ष्यांच्या युग्मांतून. ११ मदनानें व्याकुळ असतां. १२ पूर्ण.

र्णन कर. तुझें ज्ञानचक्षु अबाधित तेजानें संपन्न असो. तुला आद्यकवि ह्मणतील. असें बोलून तो तेथेंच गुप्त झाला.—असा ब्रह्मदेवाचा अनुग्रह झाल्यानंतर त्या वाल्मीकिऋषीनें प्रथम मनुष्यलोकांत शब्दब्रह्माचा परिणाम रामायणरूपानें प्रसिद्ध केला. आतां सर्व लक्ष त्याचें तिकडे लागलें आहे.

**वनदेवता**—वाहवा, तर मग हा जगत्प्रपंचाचा मोठा अभ्युदयच झाला.

**आत्रेयी**—ह्या साठीं मी ह्मटलें, कीं तेथें आमच्या अध्ययनास मोठी अडचण आली ह्मणून १

**वनदे०**—हां, मग ठीकच अडचण. योग्य.

**आत्रेयी**—हे वनदेवते, मी येथें विश्रांति घेऊन स्वस्थ झालें. आतां मला अगस्तिऋषीच्या आश्रमाचा मार्ग कोणीकडून जातो तें सांग, ह्मणजे मी त्या मार्गानें तिकडे जाईन.

**वनदे०**—येथून पंचवटीस जाऊन गोदावरी नदीच्या कांठानें नीट जा ह्मणजे अगस्तीच्या आश्रमास पावशील.

**आत्रेयी**—( डोळ्यांस पाणी आणून. ) हेंच तें तपोवन १ हीच पंचवटी १ हीच ती गोदावरी नदी १ हाच प्रस्रवण नामा पर्वत १ आणि जनस्थानची देवता वासंती ती तूंच ना १

**वनदे०**—होय, हें सर्व तसेंच आहे.

**आत्रेयी**—( करुणायुक्त होऊन. ) हे जानकी, हे वत्से !

श्लोक.

गेहा सुत्द्वर्ग तुझाचि आला ॥
गोष्टीमधें जो सहजें निघाला ॥

---

१ युक्त. २ मित्रमंडळी.

तूं नामशेषा असशी तरी तो ॥
प्रत्यक्ष दृश्या मज भासवीतो ॥ ५ ॥

**वनदे० वासंती**—( भयपावून. ) काय नामशेषा असें ह्मणते-स ? आर्यें, सीता देवीच्या जिवाला कायगे झालें ?

**आत्रेयी**—केवळ तिच्या जिवावरच आलें इतकेंच नाहीं. तिजवर अपवादही आला. ( कानांत हळूच सांगते. ) या या प्रमाणें.

**वासंती**—हायहाय, दैवानें तिजवर मोठा कठिण घाला घातला. ( असें ह्मणून मूर्छा पावते. )

**आत्रेयी**—वासंतिके, सावधहो सावधहो.

**वासंती**—( सावध होऊन) हा प्रियसखी, हा महाभागे जानकी, तुझ्या दैवीं असा दुःखाचा वांटा यावा काय ! रामभद्रा, त्वां तरी असें करावें काय ! असो तुला तरी काय बोलावें. तिचेंच दैव फिरलें. हे आत्रेयी, सीतेला अरण्यांत टाकून लक्ष्मण माघारा गेल्यावर सीतेची काय वाट झाली ह्याचें कांहीं वर्तमान ऐकण्यांत आलें आहे काय ?

**आत्रेयी**—नाहीं नाहीं. तें कांहीं ऐकण्यांत आलें नाहीं.

**वासंती**—हायहाय, काय गोष्ट वाईट झालीही; वसिष्ठ अरुंधती हीं रघुकुलास सांभाळीत असतां आणि रामाच्या वृद्ध माता जिवंत असतां अशी गोष्ट कशी घडली ?

**आत्रेयी**—असें ऐकतों कीं, त्यावेळीं वसिष्ठ अरुंधती सुद्धां सर्व मंडळी ऋष्यशृंगाच्या आश्रमास गेली होती. सांप्रतकाळीं तें द्वादशवार्षिकसत्र समाप्त झाल्यावर ऋष्यशृंगानें पूजासत्कार करून सर्वांस निरोप दिला. त्यासमयीं वसि-

---

१ नांवमात्र जिचें राहिलें. २ सुहृद्वर्ग. ३ डोळ्यापुढें आहेस अशी तूं.

ष्ठाची पत्नी अरुंधती ह्मणाली कीं, ज्या अयोध्येंत जानकी नाहीं त्या अयोध्येस मी जाणार नाहीं. ह्या तिच्या बोलण्यास रामचंद्राच्या मातांनीं अनुमोदन देऊन तोच निश्चय केला. तेव्हां वसिष्ठ बोलले कीं, तर मग आपण आतां वाल्मीकिमुनीच्या तपोवनास जाऊन तेथेंच कांहीं दिवस राहूं.

**वासंती**—बरें आतां राम राजा काय करीत आहे ?

**आत्रेयी**—त्या राजानें सांप्रत अश्वमेध आरंभिला आहे असें ऐकतों.

**वासंती**—अरेरे. एकून त्यानें दुसरी बायको केली ना !

**आत्रेयी**—शिव शिव, असें कसें होईल ?

**वासंती**—तर मग यज्ञामध्यें धर्मपत्नी कोण ?

**आत्रेयी**—सुवर्णमयी सीतेची प्रतिमा केली आहे ती.

**वासंती**—काय विलक्षण कृत्य हें !

### श्लोक.

वज्रापेक्षांहि कठिणें, पुष्पाहूनि मृदू अशीं ॥
लोकोत्तरांचीं[1] चरितें कोणा जाणवतील[2] तीं ॥ ६ ॥

**आत्रेयी**—त्या यज्ञांत वामदेवानें अभिमंत्रित असा पवित्र अश्व सोडला आहे. त्याला यथाशास्त्र रक्षणकर्ते पुरुष योजिले आहेत. त्यांवर मुख्य अधिपति लक्ष्मणाचा पुत्र चंद्रकेतु नेमिला आहे. कारण त्याला दिव्यास्त्रविद्या अवगत आहे. त्याबरोबर सेनासामग्री ही पुष्कळ दिली आहे.

**वासंती**—( गहिंवर आणून स्नेहानें व कौतुकानें ह्म० ) काय त्या बाळा लक्ष्मणाला पुत्र झाला आहे ? बरें बाई एवढा तरी मला जीवनाला आधार आहे.

---

१ अलौकिक पुरुषांचीं. २ जाणता येतील.

**आत्रेयी**—इतक्या अवकाशांत एक ब्राह्मण आपला मृतपुत्र राजद्वारीं ठेवून ऊर बडवून अनर्थ झाला, अन्याय झाला, म्हणून मोठ्यानें ओरडला. हें वर्तमान रामराजास समजतांच तो रामचंद्र करुणायुक्त होऊन, राजाच्या अपराधावांचून प्रजेला अकालमृत्यु यावयाचा नाहीं, असा विचार करीत आहे, तों अकस्मात् आकाशवाणी झाली. ती अशी.

**श्लोक.**

शंबूकनामा वृषल[1] पृथ्वीवरि करी तप ॥
नो वध्य[2] तुजला रामा मारी त्या[3] वांचवीं द्विजा[4] ॥७॥

ती देववाणी ऐकतांच प्रभुरामचंद्र तत्काळ हातांत खड्ग घेऊन पुष्पक विमानांत बसून त्या शूद्रतपस्व्याचा शोध करण्यासाठीं सर्व दिशा विदिशा फिरावयास निघाला आहे.

**वासंती**—हो खरें. शंबूकनामा कोणी शूद्र ह्याच जनस्थानच्या अरण्यांत धूम्रपान करून तपश्चर्या करीत आहे. त्याच्या निमित्तानें तरी रामभद्राचें पुन्हा आगमन या वनांत होवो.

**आत्रेयी**—बरें तर, हे वासंतिके, मी येतें आतां, लोभ असूं दे.

**वासंती**—बरें आहे, यावें, पण आत्रेयी, दिवस फार चढला आहे, कशावरून पहा.

**आर्या.**

गज[5]गंडघर्षणानें पुष्पें पडतात जीं जळावरिती
त्यांहीं श्रीगोदेची पूजा हे वृक्ष आदरें करिती ॥ ८ ॥

**श्लोक.**

स्कंधीं[6] जयांच्या बसुनी सुखानें ॥
पक्षी किडे वेंचिति ते मुखानें ॥

---

१ शूद्र. २ मारण्यास योग्य. ३ शूद्राला. ४ द्विजकुमारा. ५ गज छायेंत येऊन झाडास गंडस्थळें घासतात त्या धक्क्यानें. ६ खांदीवर.

चंचूपुटें[1] विचरिती स्वपक्ष ॥
पहा असे रम्य[2] तटस्थ[3] वृक्ष ॥ ९ ॥

( असें बोलून दोघी निघून जातात. )

( ही पुढील कथेची सूचना. )

( तदनंतर हातांत खड्ग घेऊन रामचंद्र येतो )

**रामचंद्र**—( सदय होऊन ह्मणतो. )

### श्लोक.

रे माझ्या उजव्या करा द्विजशिशू वांचावया सत्वरी ॥
टांकीं खड्ग विशंक होउनि च त्या शूद्रा तपस्व्यावरी ॥
टाकाया पटु जो वनीं प्रियसखी जी गर्भखिन्ना तशी ॥
रामाचें निज गात्र तूं असिस त्या[4] तूतें दया कायशी ॥१०॥

( मोठ्या कष्टानें खड्ग प्रहार करून ह्म० )

रामास योग्य जें कर्म तें त्यानें केलें. आतां ब्राह्मणाचा पुत्र तरी जिवंत होवो.

( शंबूक पहिला देह टाकून दुसरा दिव्य देह धारण करून येतो. )

**दिव्यपुरुष**—राम देवाचा जय असो. ह्या चरणप्रसादानें दोन गोष्टी झाल्या.

### श्लोक.

देऊनियां अभय वांचविलें द्विजाला ॥
शासूनियां[5] मज दिलें तनु वैभवाला[6] ॥
शंबूक मी नत[7] असें तुमच्या पदांतें ॥
सत्संगजा[8] मृति[9] हि घालवि आपदांतें ॥ ११ ॥

---

१ चोंचीनें. २ मनोहर. ३ गोदावरीतीरस्थ. ४ त्या रामाचें. ५ दंड-करून. ६ दिव्य देहाला. ७ नम्र. ८ थोरापासून आलें. ९ मरण.

रामचं०—ह्या दोन्ही गोष्टी मला प्रिय आहेत. तर आतां तूं जा, आणि आपल्या उग्रतपाचें फळ भोग.

**आर्या.**

आनंदमोद जेथें जेथें शिवपुण्य सौख्य हीं असती ॥
वैराजनामकीं त्या लोकीं संतत असो तुझी वसती ॥१२॥

शंबूक—हा तुमच्या पायांचा महिमा. हें तपाचें फळ ह्मणवत नाहीं. अथवा हा तपानेंच मोठा उपकार केला ह्मणावा कां कीं.

**श्लोक.**

ज्या सोधावें त्रिभुवनिं जनीं लोकनाथा शरण्या ॥
तो शूद्रातें [1]ढुंडकित मला [2]पातला या अरण्या ॥
हें पुण्याचें फळ न तरि हे लंघुनी [3]योजनातें ॥
येते कैसे सुचरण पुन्हा दंडका ह्या वनातें ॥ १३ ॥

रामचं०—हें काय दंडका वन ! ( चोहोंकडेपाहून. )

**श्लोक.**

कोठें झाडी निबिड दिसती रूक्ष ओसाड रानें ॥
ठायीं ठायीं ध्वनि हि उठती [4]निर्झरांचे [5]भैरानें ॥
येथें तीर्थाश्रमगिरि [6]तटिन्यादिकांचे [7]विभाग ॥
पूर्वीचेसे दिसति मज हे दंडकारण्य [8]भाग ॥ १४ ॥

शंबूक—हेंच दंडकावन तें. येथें तुह्मी पूर्वी कांहीं दिवस राहिलां होतां. त्यावेळेस.

**आर्या.**

चवदासहस्रचवदा राक्षस येथें च कीं तुह्मीं वधिले ॥

---

१ शोधीत. २ पावला. ३ अनेकयोजनें मार्ग. ४ प्रवाहांचें. ५ जोरानें. ६ पर्वत नदी इत्यादि. ७ भिन्न भिन्न स्थानें. ८ प्रदेश.

खरदूषणत्रिशिर ही संपविले[१] मुख्य जे तयां मैथिले[२] ॥१५॥

तेणेंकरून ह्या जनस्थानांत आह्मासारख्या भिघ्यालोकांस-हीनिर्भयपणें संचार करण्यास मोकळीक झाली.

**राम०**—तर केवळ दंडकावनच नाहीं, जनस्थानही आहे काय?

**शंबूक**—होय खरेंच. ज्यांत उन्मत्त आणि भयंकर श्वापदकुळें वास करतात, व ज्यांकडे पाहतांच सर्वांच्या आंगावर रोमांच उभे राहतात, अशीं हीं दक्षिणदिशेकडील मोठालीं घोर अरण्यें जीं दिसतात तीं जनस्थान संबंधीच होत.

## श्लोक.

कोठें शून्य[३] भयंकर ध्वनि कुठे सत्वांचिये[४] ऊठती ॥
कोठें हे ज्वलन[५] मसुप्त भुजगश्वासानिलें[६] पेटती ॥
कोठें स्वल्प जळें दरींतहि[७] अशा[८] सीमा पहा दीसती ॥
तान्हेले करें[९] भानुचे अजगरस्वेदद्रव[१०]भाशिती ॥ १६॥

**राम०**—खरेंच. तेंच हें जनस्थान.

## श्लोक.

पाहतां हें जनस्थान भूतपूर्व[११] खेरालय[१२] ॥
प्रत्यक्ष तेच वृत्तांत पूर्वींचे भासती मला ॥ १७ ॥

( चोहोंकडे पाहून. ) जानकीला बागबगीच्याची फार आवड असे, ह्मणून येथें तिचें चित्त फार रमलें होतें. तींच हीं वनें आतां किती तरी भयाण दिसतात हो! ( डोळ्यांत अश्रु आणून ह्म० )

## दिंडी.

तुह्मांसंगें राहीन ह्या वनांत ॥

---

१ मारले. २ त्या राक्षसा मैथिलें. ३ ओसाड. ४ प्राण्यांचे. ५ आग्नि. ६ निजलेल्या सर्पांच्या श्वासोश्वासानें. ७ गुहांत. ८ वनप्रांत. ९ सूर्यकिरण. १० अजगरांचा घर्मस्राव. ११ पहिलें. १२ खरासुराचें स्थान.

मंद शीतळ मधुगंधि वायु ज्यांत ॥
ह्मणत होती कीं [1]प्रिया दिवसरात ॥
स्नेह तीच्या तैसाच तो मनांत ॥ १८ ॥

## आर्या.

जरि कांहीं न करी प्रिय जन सौख्यें दुःख दूर करितो कीं ॥
तें त्यास धन विलक्षण जो ज्यास प्रिय असेल जन लोकीं॥१९॥

शंबूक—हीं दुर्गम अरण्यें राहूंद्या. आतां शांत, गंभीर, अशीं मधलीं अरण्यें पहा. ज्यांमध्यें मत्तमयूर कंठाच्या कांती प्रमाणें श्यामकांतींनीं सुशोभित असे पर्वत आहेत. ज्यांत तरुणवृक्षांची दाट झाडी आहे, त्यांची छायाही निबिड आणि नीलवर्ण दिसत आहे. आणि ज्यांत हरिणादि पशूंचे कळप निर्भयपणें संचार करीत आहेत. आणखी ह्यांत चमत्कार पहा,

## आर्या.

होतां मत्त[2]शकुंताक्रांत गळे[3]ं पुष्पसंघ [4]वानीर ॥
झालें सुरभि नद्यांचें जें शीत स्वच्छ वहातें नीर ॥ २० ॥
पक्वफलभरें दिसती श्यामळे[5] जंबूनिकुंज हे दाट ॥
ध्वनि मोठ्यानें उठती सरितांचे त्यांत वाहती पाट[6] ॥ २१ ॥
पर्वतगुहांत तरुण प्रोन्[7]मद भल्लूक[8] गर्जना करिती ॥
ज्[9]या त्या प्रतिध्वनींनीं मिश्रित होतांच दशदिशा भरिती॥२२॥
हत्तींनीं निजमस्तें शल्लकि[10]चे घर्षितां म[11]हास्कंध ॥
त्यांच्या तीक्ष्णरसांचा भरला रानांत उग्र हा गंध ॥ २३ ॥

राम०—( डोळ्यांचेंपाणी आंवरून. ) तुझा मार्ग कल्याण प्रद

१ जानकी. २ तरुणपक्ष्यांनीं आक्रमित. ३ ज्यापासून पुष्पें गळतात. ४ वेतसवृक्ष. ५ जांवळीचीं बेटें. ६ प्रवाह. ७ उन्मत्त. ८ आस्वलें. ९ त्यागर्जना. १० राय आंवळीचे. ११ मोठ्याखांद्या

असो. आतां पुण्यलोकास जाण्याकरितां विमानांत बैस जा-

**शंबूक**—फार उत्तम. परंतु प्राचीन ब्रह्मवादी अगस्त्य ऋषि येथून जवळच आहे, त्याला वंदनकरून मग शाश्वत पदास जाईन.

( असें बोलून निघून जातो. )

**राम**—( मनांत ह्मणतो. )

### श्लोक.

पुन्हां वन विलोकिलें प्रथम पाहिलें जें असे ॥
जयांत अग्नि जाहलें सुचिर राहणारे असे ॥
गृहस्थहि वनस्थही रतहि आत्मधर्मी असों ॥
प्रपंचसुख भोगितां कधिं विरक्त झालों नसों ॥ २४ ॥

### श्लोक.

ते हे गिरी वसति मोर सुंदार येथें ॥
तीं हीं वनें मृगकुळें फिरतात जेथें ॥
गंगातटें दिसति तींच सुरम्य मातें ॥
व्यापून शोभविति वेत अशोक ज्यांतें ॥ २५ ॥

### आर्या.

जो जवळुनिहि पहातां घेन घनमालेसमान दिसताहे ॥
तो प्रस्रवणगिरी हा ज्यावरि गोदावरी नदी वाहे ॥२६॥

### श्लोक.

याच्या शृंगावरिच वसती जाहली गृध्रपाची ॥
त्याच्या खालीं वसति अमुची पर्णशाळेंत साची ॥

---

१ सस्त्रीक. २ घन—दाटजी घनमाला—मेघमाला तत्सदृश. ३ जटायूची.

वृक्ष छाया निबिड, करिती शब्द नाना [1]शकुंत ॥
वाहे गोदावरिजळ असे रम्य [2]याचे [3]वनांत ॥ २७ ॥

ह्यावरून येथेंच पंचवटी असावी. ज्या पंचवटींत आमचा चिरकाळ वास झाल्यामुळें अनेक प्रकारच्या प्रसंगांवरून हे प्रदेश फारच ओळखीचे झाले आहेत आणि माझ्याप्रियेची प्रियसखी जी वासंतीनामक वनदेवता तिचें राहण्यानें ही हेंच ठिकाण तस्मात् आज मजवर केवढें संकट येऊन पडतें हें! ह्यासमयीं तर मला असें वाटतें.

### श्लोक.

करी दुःखा भारी विषरस शरीरीं पसरला ॥
जणो वेगें [4]शल्यांवयवचि ममांगांत भरला ॥
[5]कुंतग्रंथी जैसा व्रण फुटुनि मर्मीच जमला ॥
असा हा शोकाग्नी विकळ करितो मोहुनि मला ॥२८॥

तथापि मित्रांप्रमाणें पूर्ण परिचित असे जे हे वनभूमीचे भाग ह्यांकडे पहावेंसें वाटतें. ( निरखून पाहून. ) ह्या वनभूमीची रचना पालटून अस्ताव्यस्त झाली! पहा.

### श्लोक.

जिथें होतें पाणी दिसति नदिचीं तेथ [6]पुलिनें ॥
[7]विपर्यासें झालीं [8]घनविरळ सारीं तरुवनें ॥
बहूतां काळानें मज[9]विपिन वाटे [10]नवें जसें ॥
स्थिती हे [11]शैलांची सुचवि पहिलें हें वन असें ॥२९॥

ह्या पंचवटीला वल्हांडून जावें असें मी मनांत आणतों,

---

१ पक्षी. २ या पर्वताचें. ३ वनप्रदेश. ४ सलाचा अंश. ५ ज्यानें गांठ बांधली. ६ वाळवंटें. ७ उलटापालटीनें. ८ दाटतीं पातळ, पातळ तीं दाट. ९ अरण्य. १० नवीन. ११ पर्वतांचीं.

तरी हा पंचवटीप्रदेश बळानें माझें आकर्षणच करतो. काय करावें. ( करुणा युक्त होऊन. ) हाय हाय !

### श्लोक.

जीमध्यें दिवस प्रियेसह[२] तसे नेले जसे स्वगृहीं ॥
प्रेमें सांगतसों जनाप्रति जिच्या दीर्घा कथा प्रत्यहीं ॥
ती ही पंचवटी प्रियेविण कसा पाहील हा[३] पावना[४] ॥
किंवा आज तिची कसा न करितां जाईल[५] संभावना॥३०॥

( इतक्यांत शंबूक येतो. )

शंबूक—रामदेवाचा जय असो. हे रामदेवा, तुह्मी जवळ आलां आहां हें माझ्या मुखानें ऐकून भगवान् अगस्त्य मुनि तुह्मांस ह्मणत आहे कीं, एकवेळ दर्शन देऊन जावें. आपण विमानांतून उतरतांच आपणास अक्षवण करण्याची सिद्धता करून वत्सला लोपामुद्रा वाट पाहत बसली आहे. आणि शिष्य मंडळीही आपल्या दर्शनाची इच्छा धरून मार्गप्रतीक्षा करीत आहे. आपण आलां असतां आपला खोळंबा करणार नाहीं. लौकरच निरोप देऊं. तुमचें पुष्पक विमान ही वेगवंत आहे. आह्मांस दर्शन देऊन मग विमानांत बसून स्वदेशास गेलांतरी अश्वमेध यज्ञाच्या समयास जाऊन पोंहचाल.

राम०—बरें आहे. भगवान् अगस्त्य मुनि आज्ञा करतात तसें केलें पाहिजे.

शंबूक—तर मग विमान तिकडे चालवावें.

राम०—हे भगवति पंचवटिके, गुरुजनांची आज्ञा मोडतां येत

---

१ ज्या पंचवटींत. २ सीतेसह. ३ हाराम. ४ पवित्रा. ५ सत्कार. ६ मंगलार्ती. ७ ममताळू.

नाहीं, ह्मणून हा राम तुझें उल्लंघन करून तिकडे जातो, ह्याची क्षणभर क्षमाकर.

शंबूक—देवा पहा पहा ह्या वनांतील चमत्कार.

श्लोक.

कुंजांत[१] घोरें[२] घुबडें वसती तयांचे ॥
घूंत्कार[३] ऐकुनि मुंके[४] व्रंज[५] वांयसांचे[६] ॥
श्येनैंत्वना परिसतांचि समस्त सर्प ॥
वृक्षावरी लपति होउनि नष्टदर्प ॥ ३१ ॥

आर्या.

ऐसे ज्यावरि असती फार चमत्कार दर्शनीय असा ॥
हा क्रौंचावतनामा पर्वत रामा न पाहशील कसा ॥ ३२ ॥

आणखी चमत्कार पहा.

श्लोक.

ज्यांचे गुहांत रव[९] गद्गद फार होती ॥
गोदाप्रवाह बहु ज्यावर वाहताती ॥
शृंगाग्रभाग अवलंबिति मेघ ज्यांचे ॥
ते हे पहा सकल पर्वत [१०]दक्षिणेचे ॥ ३३ ॥

श्लोक.

अन्योन्य भेटी घडतां जयांच्या ॥
कल्लोळमाळा उठती जळांच्या ॥
प्रवाह गंभीर पवित्र ज्यांचे ॥
पहा महासंगम हे नद्यांचे ॥ ३४ ॥

( असें बोलून सर्व निघून जातात )

पंचवटी प्रवेश नामक दुसरा अंक समाप्तः ॥



---

१ लतागृहांत. २ भयंकर. ३ घुबडांचे शब्द. ४ शब्द रहित होतात. ५ समूह. ६ कावळ्यांचे. ७ ससाण्याचा शब्द. ८ गर्वहीन. ९ शब्द. १० दक्षिणभागींचे.

# उत्तररामचरित्र नाटक.

---

## अंक ३.

### स्थल.

पंचवटीवन.

### पात्रें.

| | |
|---|---|
| तमसा .. .. .. .. .. .. .. | सीतेचीसखी. |
| मुरला .. .. .. .. .. .. .. | लोपामुद्रेची सखी. |
| सीता .. .. .. .. .. .. .. | रामाची स्त्री. |
| रामचंद्र .. .. .. .. .. .. .. | अयोध्याधीश. |
| वासंती .. .. .. .. .. .. .. | वनदेवता. |

( तदनंतर तमसा आणि मुरला ह्या दोन नद्या स्त्रीरूप धरून येतात. )

तमसा—सखि मुरले, तूं फार गडबडीनें कोणीकडे चाललीस ?

मुरला—बाई तमसे अगस्त्यमुनीची पत्नी लोपामुद्रा हिनें मला गोदावरी नदीकडे निरोप सांगावयास पाठविलें आहे. ती ह्मणाली, गोदावरीला सांग कीं, रामभद्रानें सीतेचा त्याग केल्यापासून त्याची काय अवस्था झाली आहे, हें तूं जाणतच आहेस.

## आर्या.

न दिसे गंभीरपणें परि तेद्धृदयीं घेनव्यथा बांढ ॥
पुटेंपाकासम ज्याचा करुणारस जाहला असे गाढ ॥ १ ॥

तादृश इष्टेजनास कष्ट पडल्याच्या स्मरणानें फारच वाढले-ल्या शोकसंतापानें रामभद्र सांप्रतकाळीं फारच क्षीण झाला आहे. त्याला पाहून माझें ह्रदय कांपलें. आतां हा रामभद्र परत जातांना पंचवटी वनांतून जाईल, तेव्हां पूर्वी जानकी सहवर्तमान ज्या ज्या प्रदेशांत त्यानें निवास केला ते ते ओळखीचे प्रदेश खचीत त्याच्या दृष्टीस पडतील. आणि तो रामभद्र जरी स्वभावतः धैर्यवान् आहे तरी अशा अवस्थेंत तो त्या वनप्रदे-शांत गेला असतां अतिशयित शोकक्षोभाच्या वेगानें त्याचें धैर्य सुटून वारंवार त्याजवर मोठे कठिण प्रसंग येतील ही मला मोठी काळजी आहे. यासाठीं बाई गोदावरी, त्या त्या वेळीं रामभ-द्रास संभाळण्याविषयीं त्वां फार सावध रहावें.

## श्लोक.

आहे दुःखी राम शोकज्वरानें ॥
घालीं वारा थंड वींचीकरानें ॥
जेव्हां जेव्हां मोह होईल त्याला ॥
तेव्हां तेव्हां रक्ष त्याच्या जिवाला ॥ २ ॥

**तमसा**—स्नेहाचा दक्षपणा असा असावा हें योग्यच आहे, पण आतां रामभद्राचा संजीवनोपाय ह्मणशील तर जो मूळचा तोच, आज सहजांत जवळच आला आहे.

**मुरला**—तो कसा बरें?

---

१ रामाच्या ह्रदयांत. २ अतिदुःख. ३ दृढ. ४ अग्नींत भाजलेल्या औषधाप्रमाणें. ५ बळकट. ६ सीतेस. ७ तरंगरूप हस्तानें.

**तमसा**—ऐक कसा तो सांगतें. पूर्वीं वाल्मीकि ऋषीच्या तपोवनांत जानकीला सोडून लक्ष्मण माघारा गेल्या वर, जेव्हां जानकीला प्रसूतिवेदना झाली, तेव्हां तें दुःख तिला सोसवेना ह्मणून तिनें गंगाप्रवाहांत आपणास घालून घेतलें. मग फार वेळ गेला नाहीं तों लागलीच त्या प्रवाहांत जानकी दोन बालक प्रसवली. ते समयीं दयाळू पृथ्वी आणि भागीरथी ह्यांनीं येऊन तिचें संरक्षण केलें. पुढें ते बालक स्तनपानापासून सुटल्यावर स्वतां भागीरथीनें नेऊन वाल्मीकि ऋषीच्या स्वाधीन केले.

**मुरला**—योग्यच आहे. थोरांनीं साह्य केल्यावर कोणतीही अडचण रहावयाची नाहीं.

आर्या.

पंरिणाम हा ऐंशांचा उत्तम होतोचि दुंःखद हि जरि तो ॥
जेथें एंवंविधजन सौंहित्याला झंटोनियां करितो ॥ ३ ॥

**तमसा**—ह्या समयीं तर शंबूकाचा वध करण्याकरितां रामभद्र जनस्थानास आला आहे, असें वर्तमान भागीरथीनें शरयू मुखापासून ऐकल्यावरून जी शंका लोपामुद्रेनें स्नेहभावास्तव घेतली तीच शंका मनांत आणून भागीरथी कांहीं गृहकृत्याच्या मिषानें सीतादेवीला बरोबर घेऊन गोदावरीला भेटण्यासाठीं आली आहे.

**मुरला**—भागीरथीनें चांगला विचार केला. कीं जेव्हां रामभद्र राजधानींत होता, तेव्हां लोककल्याणाच्या अनेक कृत्यांकडे त्याचें चित्त गुंतलेलें होतें. ह्यासमयीं तर चित्तास व्यग्रता कांहींच नाहीं. एक शोकमात्र ज्याच्या चि-

---

१ शेवट. २ जानकी सारख्यांचा. ३ पूर्वीं दुःख देणाराही. ४ पृथ्वीगंगासदृश. ५ साह्याला. ६ अगस्त्यानें.

त्तास सोबती, अशा रामभद्राचा पंचवटींत प्रवेश झाला ह्मणजे मोठाच अनर्थ होणार. ह्यासाठीं तिनें सीतादेवी इकडे आणली हें बरें केलें. पण आतां सीता देवीकडून रामभद्राचें आश्वासन ती कोणत्या प्रकारें करवील कोण जाणे.

**तमसा**—आज भागीरथीनें सीता देवीला असें सांगितलें आहे कीं, अगे वत्से जानकी, आज तुझे पुत्र कुश, लव ह्यांचा बारावे वर्षांचा वाढवीस आहे, यासाठीं आयुष्य वृध्यर्थ मंगल विधि केला पाहिजे. ह्याजकरितां आपल्या हातांनीं पुष्पें आणून आपला आद्यश्वशुर आणि मनुवंशाचा उत्पादक जो निष्कलंक देव सविता त्याची पूजा कर. भिऊं नको तूं भूमिभागावर हिंडत फिरत असतां तुला आमच्या प्रभावानें वनदेवता ही पाहूं शकणार नाहींत. मग मनुष्य कोठून ? असें तिला सांगून मलाही आज्ञा केली आहे, कीं हे तमसे, जानकीचा प्रेमा तुजवर फार आहे, याकरितां तूंच हिच्या बरोबर राहून हिचें रक्षण कर. तर आतां मला भागीरथीच्या आज्ञेप्रमाणें केलें पाहिजे.

**मुरला**—तर मग आतां मला गोदावरी कडे जाण्याची गरज नाहीं, मी हा वृत्तांत लोपामुद्रेला जाऊन सांगतें. रामभद्र ही तेथें आला असेल असे वाटतें.

**तमसा**—ती जानकी पहा गोदावरीच्या डोहा पासून निघून इकडे येत आहे.

**श्लोक.**

गोदावरीमधुन जानकि हे निघाली ॥
धुंडावया पतिस काय वनी [२]रिघाली ॥

---

१ सूर्य, २ शिरली.

मूर्तीच[1] केवळ दिसे करुणारसाची ॥
किंवा व्यथा विरहजा धृतदेह साची ॥ ४ ॥

### श्लोक.

म्लान पांडुर[2] कपोल[3] जें धरी[4] ॥
लोंबती कुटिल केश ज्यावरी ॥
ऐशिया धरुनि रम्य आनना ॥
जानकी सुतनु[5] येतसे वना ॥ ५ ॥

मुरला—खरें तीच ही.

### श्लोक.

नवपल्लवकोमल अंग असे ॥
त्दद्यीं अतिदारुण शोक वसे ॥
सुकवी परिपांडु शरीर तिचें ॥
शरदर्क[6] जसा दल[7] केतकिचें ॥ ६ ॥

( असें बोलून तमसा मुरला दोघी निघून जातात. )

( ही पूर्वोत्तर कथेची सूचना झाली. )

( पडद्या पलीकडे शब्द होतो. ) काय हा अन्याय ?

( इतक्यांत फुलें वेंचीत वेंचीत सीता येते, आणि करुणा-युक्त उत्कंठेनें ऐकून ह्मणते. )

सीता—अहो, मला वाटतें माझी प्रियसखी वासंती बोलते.

( पडद्या पलीकडे शब्द होतो. )

### श्लोक.

त्या सीतेनें निजकरयुगें तोडिल्या पल्लवांनीं ॥
पूर्वी प्रेमें करिकलभ[9] हा पोशिला जो नवांनीं[10] ॥

१ मूर्तिमती. २ पांढरे. ३ गाल. ४ मुख. ५ मुखा. ६ सुंदरी. ७ शरत्कालीन सूर्य. ८ पत्र. ९ गजशावक. १० नव्या पल्लवांनीं.

सीता—( मधेंच ह्मणते. ) मग त्याचें येथें काय आहे ?

( पुन्हा पडद्यांतून. उत्तरार्ध निघतें. )

तो हा डोहीं निजयुवतिशीं क्रीडतां संमदानें ॥

वेगें अन्यें द्विरेपदतिनें गांठिला दुर्मदानें ॥ ७ ॥

सीता—( घाबरी होऊन किती एक पावलें पुढें जाऊन ह्मणते. ) हे प्राणनाथा, रक्षण कर रक्षण कर. त्या माझ्या पुत्राचें रक्षण कर. ( किंचित् विचार करून.) हाय हाय, ह्या पंचवटीच्या दर्शनानें मज मंदभाग्येच्या मुखांतून तींच पूर्वपरिचित अक्षरें येतात ! हा प्राणनाथा ! आतां माझी हाक तुला कोठून ऐकूं जाणार ! ( असें ह्मणून मूर्छा पावते. )

( इतक्यांत तमसा येते. )

तमसा—वत्से जानकी, सावध हो सावध हो.

( पडद्या पलीकडून रामाचा शब्द होतो. )

हे विमानराजा पुष्पका, येथेंच उभें रहावें.

सीता—( भय कंप आणि हर्ष ह्यांनीं युक्त होत्साती ह्मणते. ) अहो सजल मेघाच्या ध्वनी सारखा गंभीर असा हा शब्दघोष कोठून होत आहे बरें ! जो शब्दघोष माझ्या कर्णरंध्रांत शिरून मज मंदभाग्येला लागलेंच जाणो जीवदान देतो !

तमसा—( स्नेहानें डोळ्यांस पाणी आणून ह्मणते. ) सखी जानकी.

## आर्या.

अव्यक्त ध्वनिवरही उद्भवली प्रीति कां तुला ऐशी ॥

१ आनंदानें. २ दुसऱ्या गजानें ३ उन्मत्तानें. ४ पूर्वीची सवईची. ५ अस्पष्ट. ६ शब्दावर.

मेघास मयूरीशीं पाहुनि झालीस उत्सुका कैशी ॥ ८ ॥

**सीता**—बाई तमसे, अव्यक्त ध्वनि असें कां ह्मणतेस ? नाहीं नाहीं असें ह्मणूं नको. मी तर ह्या शब्दस्वरावरून खचीत ओळखलें, कीं माझा प्राणनाथच बोलला.

**तमसा**—हो हो, ऐकतें कीं तपश्चर्या करणाऱ्या कोणी एका शूद्रास दंड करण्यासाठीं इक्ष्वाकु वंशोद्भव कोणी राजा जनस्थानास आला आहे तोच हा असेल.

**सीता**—असें आहे काय ? तर मग हें मोठें भाग्य, कीं त्या राजानें आपला राजधर्म अजून सोडला नाहीं !

( पडद्याप लीकडे रामाचा शब्द होतो. )

**श्लोक.**

ज्यामाजि वृक्षमृग संघेहि बंधु झाला ॥
ज्यांत प्रियेसहित म्यां चिरें वास केला ॥
जेथें गुहा बहुत ओघहि निर्झरांचे ॥
गोदावरी जवळच्या तट हे नगांचे ॥ ९ ॥

( इतक्यांत रामचंद्राचें विमान खालीं उतरतें. )

**सीता**—( रामाकडे पाहून. ) हाय हाय, कसा हा अगदीं प्रभात काळच्या चंद्रमंडलासारखा पांडुरवर्ण आणि केवळ कृश व दुर्बळ झाला आहे. ह्याच्या आकारावरून आणि सौम्य गंभीर वर्तनावरून मात्र हा ओळखतां येतो. हाच माझा प्राणनाथ खरा. ह्याची अशी अवस्था पाहून मला मूर्छा येते. बाई तमसे मला संभाळून धर. ( असें ह्मणून तमसेच्या गळयास मिठी घालून मूर्छा पावते. )

**तमसा**—( सीतेला सांभाळून धरून ह्म० ) वत्से, सावध हो, सावध हो.

---

१ उत्कंठिता. २ समुदाय. ३ सीते सहवर्तमान. ४ बहुतकाळ. ५ पर्वतांचे.

( पडद्या पलीकडून पुनः शब्द होतो. )

ह्या पंचवटीच्या दर्शनानें मला असें होतें.

### श्लोक.

जो दुःखाग्नी अंतरीं गुप्त होता ॥
तो मोठ्यानें पेट घेणार आतां ॥
वाटे त्याचा धूम ह्या मोह[१] भारी ॥
पूर्वी मातें व्यापितो दुःखकारी ॥ १० ॥

**तमसा**—( मनांत ह्म० ) हाँ, पूर्वी लोपामुद्रा व भागीरथी ह्यांनीं जें भविष्य केलें तें हेंच.

**सीता**—( सावध होऊन ) हाय हाय, हें कसें भाषण निघालें ? ( पुनः पडद्यांतून शब्द होतो. ) हे प्रियसखी, हे दंडकारण्यांत सुख देणारी, हे जनकराजतनये. ( असें ह्मणून राम मूर्छित होतो. )

**सीता**—हाय हाय, धिक्कार असो, ह्या मज दुर्भाग्येच्या उद्देशानें हा प्राणप्रिय नेत्रकमळें मिटून मूर्छित झाला कीं !—हाय हाय काय करावें ? हा श्वासोश्वास टाकीत निश्चेष्ट होऊन अस्ताव्यस्तपणें धरणीवर पडला कीं ? बाई तमसे, धांव धांव, माझ्या प्राणप्रियाला संभाळ. पहा तो निश्चेष्ट पडला. त्याला वांचीव वांचीव. ( असें बोलून तिच्या पायां पडते. )

**तमसा**—सखे, तुजवांचून मी काय करूं ?

### आर्या.

गे कल्याणी जानकि तुजवांचुनि कोण वांचविल याला ॥
स्पर्श तुझ्या हस्ताचा प्रिय, नेइल तोच ताप विलयाला॥११॥

---

१ मोह हाच दुःखाग्नीचा धूम.

**सीता**—बरें आतां जें होणार तें होऊ. तूं ह्मणतेस तसें कां होईना. ( असें ह्मणून त्वरेनें रामाला स्पर्श करावयास निघून जाते. )

( तदनंतर भूमीवर पडलेला आणि डोळ्यांस पाणी आणून सीतेनें त्ह्दयास स्पर्श केल्यामुळें आल्हाद पावलेला असा रामचंद्र येतो. )

**सीता**—( किंचित् हर्ष पावून मनांत ह्म० ) ह्या त्रैलोक्यनाथाच्या देहांत परतुन जीवित आलें असें वाटतें.

**राम०**—( स्पर्शसुखाचा अनुभव घेऊन. ) अहाहा, काय चमत्कार झाला हा !

श्लोक.

भासे मला रसचि चंदन पल्लवांचा ॥
कीं[1] काढिला पिळुनि चंद्रकरांकुरांचा[2] ॥
हा सौख्यदायक अहा[3] त्ह्दयास सांचा[4] ॥
केला विलेपे[5] सुमहौषधिच्या रसाचा ॥ १२ ॥

श्लोक.

स्पर्श[6] हा मज गमे पहिला गे ॥
जो उरास मृदु शीतल लागे ॥
जीवऊनि मज मोह करीतो ॥
लागतां त्ह्दयताप हरीतो ॥ १३ ॥

आर्या.

संतापें जी मूर्छा आली तत्काळ घालवूनि तिला ॥
हा आनंदें देतो जडता पुनरपि तशीच मन्मतिला ॥ १४ ॥

---

१ किंवा. २ चंद्र किरण रूप अमृतांकुरांचा. ३ आश्चर्य. ४ खरा. ५ लेपन. ६ हस्तस्पर्श.

**सीता**—( भयानें कंपित होऊन त्हदयावरचा हात काढून ह्मणते. ) झालें इतकेंच ह्यासमयीं मला पुष्कळ आहे.

**राम०**—( बसला राहून. ) काय ! ती दयाळू सीतादेवीच माझ्या जवळ आली काय ?

**सीता**—हाय हाय, आतां प्राणनाथ मला सोधूं लागेल. कसें करावें बरें ?

**राम०**—असो, पाहतों बरें आली कीं काय ती.

**सीता**—बाई तमसे, आपण अंमळ एकीकडे व्हावें हें बरें. कदाचित् प्राणनाथानें मला पाहिलें तर त्याच्या आज्ञेवांचून मी जवळ आलें इतक्यावरून तो मजवर फारच कोपकरील.

**तमसा**—अगे वत्से जानकी, भागीरथीच्या वरप्रसादेंकरून वनदेवतांसही तूं अदृश्य आहेस. भितेस कां ?

**सीता**—होय, असें आहे खरें मला स्मरण नव्हतें.

**राम०**—हे प्रियसखी जानकी, हे प्राणप्रिये जानकी.

**सीता**—( आपणासीं बोलते. ) हे प्राणनाथा, आज पर्यंत जो वृत्तांत झाला त्याला हें भाषण अयोग्य दिसतें. मी खरी प्राणप्रिया असतें तर माझी अशी दशा कां झाली असती ? अथवा हें मी काय मनांत आणतें. येणेंकरून मी वज्रत्हदया आहे असें होईल. कां कीं, जिला जन्मांतरीं ही दर्शन होणें कठीण अशी जी मी दुर्दैवी हिला उद्देशून ह्या प्रकारचें भाषण करणारा जो माझा प्राणप्रिय त्यावर मी रागें भरतें तर मी अशी निष्ठुर कशी होऊं ? त्याचें त्हदय मी जाणतें, आणि माझें त्हदय तो जाणतो. माझ्या दैवीं होतें तें झालें. ह्याचा दोष म्यां त्याकडे कां लावावा ?

**राम०**—( चोहोंकडे पाहून.) हाय हाय, येथें कोणी नाहीं, मला भ्रांति झाली काय ?

**सीता**—कायगे तमसे, त्या वेळेस ह्यानें माझा विनाकारण परित्याग केला. ह्यावरून तर माझें त्द्दय ह्याजकडे वळूंनये, असें असतां ह्यासमयीं ह्याला अशा प्रकारचा पाहून माझें त्द्दय ह्याजवर इतकें कां आसक्त होतें हें मला समजत नाहीं.

**तमसा**—वत्से जानकी, असें कां होतें तें मी समजलें. सांगतें.

### दिंड्या.

निराशेनें जाहलें उदासीन ॥
चित्त तूझें विप्रियें फार खिन्न ॥
करुण वचनें याचिया होय दीन ॥
तरी सौजन्यें असे सुप्रसन्न ॥ १४ ॥
तुझें आर्धीं चित्त तें महोदार ॥
दीर्घविरहें उत्सूक असे फार ॥
तया पाहोनी न करितां उशीर ॥
अला प्रेमाचा पूर त्या गंभीर ॥ १५ ॥
चित्त तूझें वाटतें चंद्रकांत ॥
पुढें येतां प्रिय पूर्णचंद्र कांत[२] ॥
प्रेमपाझर सूटला तैया[३] भारी ॥
घडे स्वाभाविक[४] कोण तया वारी ॥१६ ॥

**राम०**—हे देवी जानकी, कोठें आहेस !

### साक्या.

स्नेहें आर्द्र[५] सुशीतल ऐसा स्पर्श तुझा मज झाला ॥
स्पर्श नव्हे हा मजवरी तूझा मूर्त[६] प्रसाद आला ॥ १७ ॥

---

१ मोठा. २ पति. ३ चित्तास. ४ आपोआप. ५ स्निग्ध. ६ मूर्तिमंत.

आज्ञुणि मातें स्निग्ध करीतो नवल मला हें मोठें ॥
जीचा स्पर्श प्रियकर ती तूं आतां असशी कोठें ॥ १८ ॥

**सीता**—ज्यांत अपार स्नेहभाव दिसून येतो, ज्यांत आनंदाश्रूच्या धारा चालतात, असे हे प्राणनाथाचे विलापशब्द ऐकून, जरी माझें जन्म निष्कारणपरित्यागानें दूषित झालें आहे, तरी हा जन्मलाभ मला फारच मानवला, आणि धन्यसा वाटला.

**राम०**—अथवा प्रिया येथें कोठून येणार ? मला निरंतर तिचा ध्यास लागला आहे. त्या दृढ अभ्यासा मुळें हा मला भ्रम झाला असेल असें वाटतें.
( पडद्या पलीकडून शब्द होतो. ) काय हा प्रमाद काय हा प्रमाद ! ( पूर्वोक्त श्लोकार्ध. )
त्या सीतेनें निजकरयुगें तोडिल्या पल्लवांनीं ॥
पूर्वी प्रेमें करिकलभ हा पोशिला जो नवांनीं ॥

**राम०**—( करुणायुक्त होऊन उत्कंठेनें ह्म० ) मग त्याचें काय आहे ?

( पुन्हा पडद्यांत शब्द होतो. उत्तरार्ध. )

तो हा डोहीं निजयुवतिशीं क्रीडतां संमदानें ॥
वेगें अन्यें द्विरदपतिनें गांठिला दुर्मदानें ॥

**सीता**—ह्यासमयीं कोण बरें त्याला सोडवील ?

**राम०**—कोठें आहेतो. कोठें आहे तो दुरात्मा? जो माझ्या प्रिय सखीच्या पुत्रास आणि त्याच्या स्त्रीस पीडा देतो. ( असें ह्मणून झटकर उठतो. )

**वासंती**—( प्रवेश करून मोठ्या गडबडीनें ह्मणते. ) कोण, देव रघुनंदन रामभद्र काय ?

---

१ स्नेहयुक्त.

सीता—अहो ही माझी प्रियसखी वासंती काय ?

वासंती—रामदेवा, तुझा जय असो.

राम०—( तिजकडे पाहून,) कोण ही माझ्या जानकीची प्रियसखी वासंती काय ?

वासंती—रामदेवा, त्वराकर त्वरा कर. येथून जवळच जटायु पर्वताच्या शिखरा खालीं सीता तीर्थाच्या दक्षिणेस गोदावरी प्रत जाऊन त्या सीतादेवीच्या पुत्रकाचें संरक्षण कर.

सीता—हा तात जटायो, तुझ्या वांचून हें जनस्थान अगदीं शून्य दिसतें.

राम०—ह्या गोष्टी त्हृदयमर्म भेदणाऱ्या आहेत.

वासंती—महाराज, इकडून ह्या वाटेनें यावें.

सीता—कायगे तमसे, खरेंचका मी कोणास दिसत नाहीं ? वनदेवता देखील मला पाहूं शकत नाहींत ना ?

तमसा—अगे वत्से जानकी, सर्व देवतां पेक्षां भागीरथीदेवीचें सामर्थ्य मोठें आहे. तिचें बोलणें खोटें व्हावयाचें नाहीं. मग उगीच कां शंका मनांत आणितेस ?

सीता—तर मग आपण निः शंक पुढें जाऊं.

( असें ह्मणून दोघी पुढें जातात. )

राम०—हे भगवती गोदावरी तुला नमस्कार असो.

वासंती—रामदेवा, आनंदाची गोष्ट झाली. सीतादेवीचा पुत्र गजराज स्त्रीसहवर्तमान विजयी होऊन आला.

राम०—हे पुत्रका, विजयी आणि दीर्घायू हो.

सीता—काय आश्चर्य हें ! एकून माझा लाडका व्त्स इतक्या योग्यतेचा झालाना ?

राम०—हे महादेवी जानकी, तूं मोठ्या दैवाची होस. पहा.

### श्लोक.

ज्यानें बाळपणीं तुझ्याच जवळी येऊनि दंतांकुरें[1] ॥
ओढावा तव कर्णपल्लव[2] भयें दूरूनि किंवा करें[3] ॥
तो हा पुत्र तुझा गजायुतबळी[4] झाला कसा गे पहा ॥
जें कल्याण घडे वयांत तरुणा[5] त्या जाहला पात्र हा ॥२०॥

**सीता**—झाला उदंड आयुष्य असो. आणि झाला स्वस्त्रीशीं वियोग कधीं न घडो.

**राम०**—गे सखि वासंती, बायकोची बरदास्त कशी ठेवावी ह्या-विषयींचें चातुर्य हा वत्स कसा शिकला आहे पहा !

### श्लोक.

श्रांता[6] स्वकांता[7] निरखूनि सत्वरी ॥
करी करानें[8] जलसेक[9] तीवरी ॥
छत्रापरी पुष्करपत्रही[10] धरी ॥
स्नेहें प्रियेचा श्रमखेद[11] तो हरी ॥ २१ ॥
लीलेनें उपडुनि अब्जनालखंडें[12] ॥
दंतांनीं चघळुनि काढितो स्वतुंडें[13] ॥
भक्षाया कवळ[14] तिला करोनि देतो ॥
कांतेचें[15] मन रमवी कसें पहा तो ॥२२॥

**सीता**—बाई तमसे, हा तर अशा योग्यतेचा झाला. परंतु ते कुश,लव इतक्या दिवसांत कसे झाले असतील कोण जाणे.

**तमसा**—जसा हा झाला तसेच तेही झाले असतील.

---

१ दंताग्रानें. २ कानावरचा भूषणरूप पल्लव. ३ शुंडाग्रानें. ४ दहासहस्र हत्तींचें बळ आहे असा. ५ तरुणवयांत. ६ दमलेली. ७ स्वस्त्री. ८ सोंडेनें. ९ पाणी शिंपडणें. १० कमलपत्र. ११ श्रमदुःख. १२ कमळाच्या देंठाचे तुकडे. १३ आपल्या तोंडानें. १४ ग्रास. १५ स्त्रियेचें.

**सीता**—मी केवढी गे मंदभाग्या ही ! मी केवळ पतिविरहाचेंच दुःख भोगितें असें नाहीं. पुत्रविरहाचेंही दुःख भोगितें.

**तमसा**—बाई वत्से, भवितव्यच असें. दैवापुढें कोणाचा उपाय चालत नाहीं.

**सीता**—काय तरी दैवाची गति विलक्षण ही ! मी पुत्र प्रसवून व्यर्थ. कां तर पहा. विरळ कोमळ आणि धवळ असे दंत, गोजिरवाणे गाल, मंद मनोहर हास्य, कुरुळ आणि काळीं अशीं लहान लहान झुलपें, इतक्यांनीं शोभणारीं अशीं माझ्या त्या पुत्रांचीं मुखकमळें माझ्या प्राणपतीनें चुंबिलीं नाहींत.

पद

प्रसवुनि म्यां काय केलें ॥ कीं सारें व्यर्थ गेलें ॥ ध्रु० ॥
नाहीं पुत्रावण पुत्राचें ॥ नाहीं सुख ही बारशाचें ॥
प्राणनाथें मुख त्यांचें ॥ नाहीं डोळां पाहिलें ॥ प्रस० ॥१॥
अंकीं घेउनियां सुखाचें ॥ सांठवण लावण्याचें ॥
मुखकमळही तयांचें ॥ प्रेमें नाहीं चुंबिलें ॥ प्रस० ॥ २ ॥
रांगत आलिया बाळांतें ॥ पावोनियां आनंदातें ॥
हातीं उचलोनी तयांतें ॥ कडिये नाहीं घेतलें ॥ प्रस० ॥३॥

**तमसा**—( गाहिंवरून, ) असो, देवताप्रसादानें सर्व कांहीं.

**सीता**—बाई तमसे, पहा पुत्रांच्या स्मरणानें माझ्या स्तनांस पान्हा आला, आणि त्यांच्या पित्याचें सांनिध्यही झालें. येणेंकरून क्षणभर मी संसारिणी स्त्रीप्रमाणें आपल्या घरींच आहें काय असें मला वाटतें.

**तमसा**—खरेंच आहे, हें काय सांगावें ! स्त्रीपुरुषांचा जो परस्पर अतिशयित स्नेह असतो तोच अपत्यरूपानें परिणाम पावतो. ह्मटलें आहे.

## आर्या.

दंपत्यांचीं अंतःकरणें स्नेहेंचि एकवट होती ॥
होतो आनंदाचा ग्रंथि तयाला अपत्य कीं ह्मणती ॥२४॥

**वासंती**—( इकडे रामास ह्म० ) महाराज, तिकडे पहा काय चमत्कार तो.

## श्लोक.

नवे दीसती चित्र ज्याचे पिसारे ॥
तुरा मस्तकीं शोभतो हा कसा रे ॥
कदंबावरी तो प्रियेच्या समोर ॥
पहा नाचतो होउनी मत्त मोर ॥ २५ ॥

**सीता**—( कौतुकानें डोळ्यांस पाणी आणून. ) हाच तो बरें. हाच तो मोर.

**राम०**—वत्सा खुशाल ऐस.

**सीता**—असेंच असो.

**राम०**—हे मयूरा, तूं माझा पुत्रच आहेस. कां कीं.

## श्लोक.

जशी भ्रुकुटि चाळवी नयनगोल ही हालवी ॥
तसा फिरसि तूं तुला स्वकरपल्लवें पालवी ॥
धरून करताल ती प्रियसखी तुला नाचवी ॥
सुतापरि तुला मनीं समजुनी सुखा सांचवी ॥ २६ ॥

काय चमत्कार हा! पक्षी देखील पूर्वीचा परिचय विसरले नाहींत. ह्यांस जानकीचें अजून स्मरण होतें असे वाटतें.

---

१ स्त्रीपुरुषांचीं. २ पंख. ३ स्त्रीच्या. ४ बुबुळें. ५ हस्तांगुलींनीं. ६ बोलावी. ७ हातानें ताल. ८ मानानें.

श्लोक.

झाला कदंबतरु पुष्पित हा दयेनें ॥
घालूनि जो उदक वाढविला प्रियेनें ॥

**सीता**—( पाहून डोळ्यांस पाणी आणून ह्मणते. ) प्राणनाथानें चांगलें जाणलें.

**राम॰**—( उत्तरार्ध ह्मणतो. )

बैसूनि त्यावर मयूर सुखें निवाला ॥
वाटे खरा स्वजनसा स्मरतो तयाला ॥ २७ ॥

**वासंती**—रामदेवा, आतां येथें आसन टाकून क्षणभर बसावें. हें स्थळ तुझ्या परिचयाचें असेल.

श्लोक.

रंभावनांतिल[1] शिलातल[2] हेंच रामा ॥
आलें प्रियेसह तुला शयनास[3] कामा ॥
सीता इथेंच तृण देत बसे मृगांतें ॥
सोडून जात नव्हते मृग या स्थलातें ॥ २८ ॥

**राम॰**—हें स्थळ माझ्यानें पाहवत नाहीं ( असें ह्मणून रुदन करीत दुसरीकडे जाऊन बसतो. )

**सीता**—( वासंतीस उद्देशून मनांत ह्म॰ ) सखी वासंतीनें काय केलें हें ? प्राणनाथाला आणि मला हें स्थळ दाखवून अधिक शोकांत घातलें. हाय हाय धिक्कार असो. पहा, तोच प्राणनाथ; तेंच पंचवटीवन; तीच पंचवटी; तीच वासंती; तेंच ओळखीचे गोदावरीच्या कांठचे प्रदेश; तेच पुत्राप्रमाणें मानलेले पशु, पक्षी आणि वृक्ष; आणि तीच मी; असें असतां मज मंदभाग्येला हें सर्व दिसत असून नाहीं सारखें

१ कदलीवनांतील. २ खडकाचा चौथरा. ३ निद्रेस.

झालेंना ! तस्मात् जीवलोकाची दशा अशीच विलक्षण आहे.

**तमसा**—सखे जानकी, ह्यासमयीं रामभद्राची कशी अवस्था झाली आहे ती तूं पाहत नाहींस काय ?

**श्लोक.**

कुवलयदलस्निग्धें[1] अंगें करी नेयनोत्सवा[2] ॥
सतत जरि हा पाहों[3] आला तथापि गमे नवा ॥
विकल[4] दिसती याचीं अंगें पहा कृश पांढरीं ॥
कठिण पडतें जाणायाचें रुचे नयनां तरीं ॥ २९ ॥

**आर्या.**

कुवलयपत्रस्निग्धें अंगें देणार तोष[6] नयनातें ॥
जरि पाहिला निरंतर तरि वाटे जो नवीनचि मनातें ॥ ३० ॥
तो हा शोकें पांडुर[7] कृश दुर्बळ जाहला पहा याला ॥
कष्टेंच[8] ओळखाया जोगा परि आवडे पहायाला ॥ ३१ ॥

**सीता**—पाहतें बरें, सखी, मी त्यालाच पाहतें.

**तमसा**—सखि जानकी, तुला असेंच निरंतर प्रियदर्शन घडो.

**सीता**—आहारे दैवा, हा मजवांचून आणि मी ह्यावांचून असण्याची कल्पना स्वप्नांत तरी कोणाला झाली असेल काय? मला वाटतें ह्याच्या माझ्या वियोगामध्यें किती जन्में गेलीं कोण जाणे. माझ्या डोळ्यांचें पाणी तर खळत नाहीं, तथापि त्यांतच कसें तरी करून मुहूर्तभर प्राणनाथास पाहून घेतें. ( असें ह्मणून रामचंद्राकडे पाहत राहते. )

**तमसा**—( स्नेहानें नेत्रांस अश्रू आणून सीतेला आलिंगन देऊन ह्म० ) कायगे तुझी तटस्थवृत्ति ही !

---

१ कमलपत्रासारख्या मृदु अंगानें. २ नेत्रानंदाला. ३ पाहण्यांत आला. ४ म्लान. ५ आवडे. ६ संतोष. ७ पांढरा. ८ यत्नानें.

### श्लोक.

सानंदशोकें भरलीस भारी ॥
नेत्रांतुनीं वाहति बाष्पवारी ॥
वाटे मला न्हाणिशि तूं त्वदिस्था[1] ॥
प्रिया अशी हे दिसते अवस्था ॥ ३२ ॥

**वासंती**—अहो वनदेवतांनो, हा रामभद्र आपल्या घरीं आला आहे, ह्यासमयीं ह्याचा उत्तम प्रकारें सत्कार व्हावा हें योग्य आहे.

### श्लोक.

फलमधुकुसुमांनीं वृक्ष पूजोत सारे ॥
स्फुट[2]कमलसुगंधी मंद वाहोत वारे ॥
मधुरतर करावा शब्द येथें शकुंतीं[3] ॥
फिरुनि सहज आला राम कीं या वनांतीं ॥ ३३ ॥

**राम**—सखि वासंती, ये आपण एथें बसूं.

**वासंती**—( बसल्यावर डोळ्यांस पाणी आणून ह्म० )

महाराज, कुमार लक्ष्मण खुशाल आहे कीं ?

**राम०**—( न ऐकिलेंसें करून बोलतो. )

### श्लोक.

तृण जल वनधान्यें देउनी अंजलीनें ॥
मृग[4] तरु शकुनी जे पोशिले मैथिलीनें ॥
निरखुनिच तयांतें होय कांहीं विकार[5] ॥
द्रवसम त्वदयाला स्पष्ट हा भेदणार ॥ ३४ ॥

**वासंती**—महाराज, मी विचारतें हें अगोदर सांगा कीं, कुमार लक्ष्मण खुशाल आहे ना ?

---

१ त्वदयास्थित प्राणेश्वरास. २ फुललेलीं. ३ पक्ष्यांनीं. ४ पशु वृक्ष पक्षी. [illegible] तृण जळ वनधान्यें यांनीं पोशिले. ५ द्रवसम विकार.

**राम**—( आपल्या मनांत ह्म० ) हिनें मला महाराज असें उपरोधिक संबोधन दिलें, आणि लक्ष्मणाचा कुशल प्रश्न करतांना हिचा गळा दाटून आला, नेत्रांस अश्रू आले; ह्यावरून मला वाटतें सीतेचा वृत्तांत हिला समजला आहे. असो. ( उघडपणें. ) हो हो कुमार लक्ष्मण खुशाल आहे. ( रडूं लागतो. )

**वासंती**—बा रामा, तूं असा कठोर त्हृदयाचा कसारे झालास ?

पद्य ३५.

कितिरे असशीं तूं निष्ठुर रामा ॥ नवमेघश्यामा ॥ ध्रु० ॥
कुसुमाहुनि ही जी अतिसकुमारी ॥ मिथिलेशकुमारी[1] ॥
उदरीं गर्भाचें ओझें भारी ॥ ती स्त्री कांतारीं[2] ॥ विजनीं
नेउन त्यजिली कैशी ॥ एकाएकीं निजविश्रामा ॥ किति० ॥ १ ॥
प्राणाहुनियां ही जी प्रिय तुजला ॥ मोकलिलें[3] तिजला ॥
प्रेमा तिजविषयीं कोठें गेला ॥ उर नाहीं भिजला[4] ॥
वचनीं राहुनि काम मनांतिल ॥ पुरवी ऐशी त्यजिली रामा ॥ कि० ॥ २ ॥
अबलेची त्या गति होइल कैशी ॥ स्मृति नाहीं ऐशी ॥
व्याघ्राच्या वदनीं गाई जैशी ॥ त्यजिली त्वां तैशी ॥
प्रभु तूं तुजला काय ह्मणावें, ॥ इच्छिसि तैशा करिशी कामा ॥ कि० ॥ ३ ॥

**सीता**—सखी वासंती, तूं आह्मां उभयतांची सखी असून असें काय बोलतेस ? माझा प्राणनाथ तसा नाहीं. तो सर्वांस प्रिय आहे. तुला तर विशेषेंकरून प्रिय असावा.

**वासंती**—( मनांत खेद करून. ) हरहर काय दैवगती ही ?

श्लोक.

तूं जीव तूं त्हृदय तूं मजला विसांवा ॥
तूं चंद्रिका च नयना शरिरा सुधा[5] वा ॥

---

१ जनककन्या सीता. २ वनांत. ३ सोडिलें. ४ अश्रूंनीं नाहीं भिजला. ५ अमृत.

मोहीं जिला वदुनि यापरि गुंतवावें ॥
तीतेंच—हाय तुज काय पुढें म्हणावें ॥ ३६ ॥

( असें बोलून मूर्छा पावते. )

**राम॰**—( मनांत ह्म॰ ) पुढें न बोलणें आणि मोह पावणें ह्या दोन्ही गोष्टी लेहास योग्यच आहेत. ( उघडपणें ) सखे सावध हो सावध हो.

**वासंती**—( सावध होऊन, ) तर मग अशी अयोग्य गोष्ट आपण कां केली बरें ?

**सीता**—सखी वासंती, अजून तरी पुढें बोलूं नको. उगीच रहा.

**राम॰**—लोकांस सोसेना ह्मणून.

**वासंती**—कोणत्या कारणामुळें !

**राम॰**—कोणतें कारण तें लोकच जाणत असतील.

**तमसा**—लोकांविषयीं वाईट शब्द आजच काय तो निघाला.

**वासंती**—लोकांची समजूत कशीही असली ह्मणून त्वां असें करावें काय ? ह्यांत काय मिळविलें ?

श्लोक.

कठिणत्हृदय रामा आवेड कीर्ति तूतें ॥
तरि वद अपकीर्ती याहुनी काय मातें ॥
वनिं गति अबलेची काय झाली असेल ॥
तव त्हृदयिं नरेंद्रा वाटतें काय बोल ॥ ३७ ॥

**सीता**—हे वासंती, तूंच कठिण त्हृदयाची आहेस. ज्या अर्थी तूं दुःखावर डाग देतेस.

**तमसा**—प्रीती असें वदविते आणि शोकही.

**राम**—सखी वासंती, दुसरें काय वाटवयाचें आहे !

१ स्त्रीची.

### श्लोक.

भ्याल्या मृगापरि जिची सुविलोल दृष्टी ॥
जी पूर्ण गर्भ धरितां बहु होय कष्टी ॥
तीची शरीरलतिका कुसुमें स्तवावी ॥
रानांत हिंसकजनीं गिळिली असावी ॥ ३८ ॥

**सीता**—प्राणप्रिया, ही मी जिवंत आहें बरें, जिवंत आहें. मला कोणीं गिळिलें नाहीं.

**राम०**—हे प्राणप्रिये जानकी, आतां तूं कोठें आहेस ?

**सीता**—हाय हाय, प्राणनाथ ही गळा मोकळा करून रडूं लागला कीं !

**तमसा**—वत्से, असेंच केलें पाहिजे. जे दुःखित आहेत त्यांनीं रडूनच दुःखें घालवावीं. दुसरा उपाय नाहीं. म्हटलें आहे.

### आर्या.

जळ तुंबतां तडागीं फोडावा लागतो जसा पाट ॥
शोकक्षोभीं रोदन त्द्दयस्थैर्या नसे दुजी वाट ॥ ३९ ॥

विशेषेंकरून रामभद्रास तर ही जीवलोकस्थिति कष्टप्रदच आहे. पहा,

### साक्या.

पाळावें विश्वातें विधिनें स्वस्थ करूनि चित्तातें ॥
प्रियाशोक जीवातें सुकवी उष्ण जसा कुसुमातें ॥ ४० ॥
आपण करुनि त्याग विलापहि करणें अवघड ज्याला ॥
सांपडला अवकाश तयाला रोदन लाभचि झाला ॥ ४१ ॥

---

१ चंचल. २ अंगलता. ३ मृदुत्वाविषयीं पुष्पांनीं स्तवण्यास योग्य. ४ व्याघ्र राक्षस इत्यादिकांनीं. ५ तळ्यांत. ६ शोकातिशयीं. ७ ग्रीष्मकाळ.

**राम०**—काय दुःख हें किती सोसावें तरी.

### श्लोक.

हृदय उलतें शोकें माझें न व्हे द्विविधा तरी ॥
विकल करिते मूर्छा काया न जीवित संहरी ॥
अंतुनि तनुशी भाजी ज्वाळा न भस्म करीतसे ॥
विधि जरि करी मर्मच्छिदा न जीव हरीतसे ॥ ४२ ॥

**सीता**—होय असेंच आहे खरें.

**तमसा**—सखी जानकी, तुझ्या करितां रामभद्रास जें दुःख होतें तें तूं प्रत्यक्ष पाहत आहेस ना ?

**सीता**—काय करावें. पाहण्याचें कपाळीं आलें खरें.

**राम०**—( आपणाशीं बोलतो. ) अहो अयोध्यापुरवासी, देशवासी, जन हो, तुह्मांस प्रार्थितों.

### श्लोक.

स्थिति निजगृहीं त्या देवीची तुह्मांस न रूचली ॥
ह्मणुनि तृणवत् ती म्यां रानीं त्यजूनि न शोचली ॥
परि परिचिता त्या त्या वस्तू न राहविती धिरा ॥
ह्मणुनि रडतों हा मी येथें क्षमा जन हो करा ॥ ४३ ॥

**तमसा**—शोकसागरास फार मोठी भरती आली ?

**वासंती**—रामा, जो गोष्ट होऊन गेली तिजविषयीं आतां धैर्यच धरलें पाहिजे.

**राम०**—सखे, धैर्य धरावें ह्मणून सांगायास नको. धैर्यच आहे पहा.

### श्लोक.

त्या देवीनें शून्य हा लोक झाला ॥

---

१ दुभंग. २ शरीरास. ३ शोकाग्नीची ज्वाळा. ४ दैव. ५ मर्मच्छेदाला. ६ जानकीची. ७ शोक नाहीं केला. ८ ओळखीच्या. ९ धैर्यास. १० राहित.

बारा वर्षें लोटलीं कीं तयाला ॥
माया तीचें जाहलें नष्ट नाम ॥
आहे अद्यापीहि जीवंत राम ॥ ४४ ॥

**सीता**—प्राणनाथाच्या ह्या वचनांनीं मी शोभित झालें.

**तमसा**—अगे वेडे मुली, त्याच्या वचनांनीं शोभित झालें ह्मणतेस काय ? पण असें नव्हे.

**आर्या.**

प्रियतम नव्हेत जरि या स्नेहार्द्रा शोकदारुणा वाचा ॥
ह्या तुजवर मधुधारा पडती परि त्यांत सविष रस साचा ॥४५॥

**राम०**—अगे वासंती, पहा बरें, म्यां—

**श्लोक.**

वेगें उरीं बाणचि लागतो तसा ॥
किंवा अहीचा विषयुक्त दंतसा ॥
जो शोकशंकू ह्रदयास लागला ॥
तो मर्मभेदी तरि कां न साहिला ॥ ४६ ॥

**सीता**—काय मी मंदभाग्या ही ! प्राणनाथास वारंवार आयास आणि दुःख देणारी झालें ना ?

**राम०**—पहा मी आपल्या अंतःकरणास किती जरी आंवरून स्थिर करावयास पाहतों तरी पूर्वपरिचित अनेक प्रिय पदार्थांच्या दर्शनानें हा शोकाचा उद्दाम वेग आटोपत नाहीं. काय करूं ?

**श्लोक.**

शोकक्षोभप्रसरशमनीं यत्न जो जो करावा ॥
मोठ्या कष्टें करुनि ह्रदयीं सावधानें धरावा ॥

---

१ सर्पाचा. २ शोकरूप खिळा. ३ शोकक्षोभाचा जो अतिशय त्याच्या शांतीविषयीं.

त्यातें[1] त्यातें मथुनि[2] पसरे अंतरीं त्द्विकार[3] ॥
क्षेत्रीं[4] जैसा मथुनि सिकता[5]सेतुतें तोय[6]पूर ॥ ४७ ॥

**सीता०**—ह्या प्राणनाथाच्या दुर्वार आणि दारुण दुःखामुळें मला ही अतिशयित दुःखक्षोभ होऊन माझें त्हृदय थर थर कांपलें.

**वासंती**—( मनांत ह्मणते. ) हा रामदेव तर फारच शोकसंकटांत पडला. ह्यास्तव ह्याचें चित्त दुसरीकडे लाविलें पाहिजे. ( उघडपणें ह्म० ) महाराज, हे पंचवटीचे प्रदेश तुमच्या फार दिवसांचे ओळखीचे आहेत. ह्यांकडे पाहून ह्यासमयीं अंतःकरणास कांहीं आनंद द्यावा.

**राम०**—बरें आहे. तसेंच करतों. ( असें ह्मणून उठतो आणि इकडे तिकडे फिरतो.

**सीता**—प्रियसखीनें प्राणनाथाच्या चित्तास समाधान होण्यासाठीं जो उपाय ह्मणून योजला तोच त्याच्या दुःखाग्नीस अधिक पेटविणारा आहे. हें तिच्या मनांत कसें आलें नाहीं; आतां काय काय दाखवील कोण जाणे !

**वासंती**—( करुणायुक्त होऊन. ) रामदेवा, हें लतागृह पाहिलें काय ?

### श्लोक.

याँ[7] कुंजांतचि वाट पाहत तिची[8] होतास, ती गोमटी[9] ॥
होती हंसविलास[10] देखत उभी गोदावरीच्या तटीं ॥
येतां खिन्न तुला विलोकुनि तिच्या[11] शंका मनीं वाटली ॥
भीतीनें तुज हात जोडुनि तिनें केला प्रणामांजली ॥ ४८ ॥

---

१ त्यान्या यत्नातें. २ नासुनी. ३ त्हृदयाला विकार. ४ शेतांत. ५ वाळूच्या बांधातें. ६ पाण्याचा लोंढा. ७ लतागृहांत. ८ सीतेची. ९ सुंदरी सीता. १० हंसक्रीडा. ११ सीतेच्या.

**सीता**—अगे वासंती, तूं फार कठोर मनाची आहेस. कीं, ह्या अशा ऱ्हदयभेद करणाऱ्या भाषणांनीं माझ्या प्राणनाथाला आणि मज मंदभाग्येलाही पुनः पुन्हा दुःख देतेस.

**राम०**—अगे कोपिष्टे निर्दये जानकी, जवळपास असल्या सारखी वाटतेस, पण दिसत नाहींस. मज मंदभाग्याची तुला दया येत नाहीं काय ?

**श्लोक.**

हाहा देवी ऱ्हदय फुटतें देह माझा गळाला ॥
वाटे शून्य त्रिभुवन मला अंतरात्मा जळाला ॥
या आत्म्यानें किति तरि सदा दुःखभारा धरावें ॥
मोह व्यापी फिरफिरुनि ग्यां काय आतां करावें ॥४९॥

**सीता**—हाय हाय, धिक्कार असो कर्माला. पुनः प्राणनाथ मोहग्रस्त झाला

**वासंती**—रामदेवा, सावध हो सावध हो.

**सीता**—अगा हे प्राणप्रिया, तूं सकल जीवलोकांच्या मंगलास आधार असतां तुझ्या अवताराचा मज मंदभाग्येच्या कारणानें जीव जातो का राहतो अशा प्रकारचा भयंकर परिणाम व्हावा काय ! हाय हाय, जळो माझें जीवित. काय हो नष्ट मी कीं, प्राणनाथाची अशी दशा डोळ्यांनीं पाहतें ! ( असें ह्मणून मूर्छा पावते. )

**तमसा**—वत्से जानकी, सावध हो २. अगे धीर धर. घाबरू नको. ऊठ आणि पुनः रामभद्राला आपल्या हस्ताचा स्पर्श कर. हाच त्याच्या संजीवनाचा मुख्य उपाय आहे.

**वासंती**—काय अजून रामदेव सावध होत नाहीं ! हे प्रियसखी जानकी, तूं कोठें आहेस ? आतां लौकर ये आणि आपल्या प्राणेश्वराला जीवदान दे.

**सीता**—( त्वरेनें रामाच्या जवळ जाऊन त्याच्या हृदयास आणि मस्तकास हस्तस्पर्श करिते. )

**वासंती**—रामभद्र सावध होऊन देहभानावर आला हें मोठेंच भाग्य.

**राम०**—( सावध होऊन ह्मणतो. )

### श्लोक.

वाटे कीं अमृतमयप्रलेपनांनीं[1]
बाहेरी अंतुनिहि देह सारवूनी ॥
हा स्पर्शक्षण मज वांचवूं पहातो ॥
आनंदें मज दुसराच मोह देतो ॥ ५० ॥

( आनंदांत डोळे झांकून ह्मणतो. ) हे सखि वासंती, तुझें मोठें भाग्य.

**वासंती**—कसें रामदेवा ?

**राम०**—अगे कसें तें काय ! जानकी पुन्हा प्राप्त झाली.

**वासंती**—हां हां रामदेवा, कुठे आहे ती ?

**राम०**—( स्पर्शसुखाचा अनुभव घेत ह्म० ) अगे, ही पुढेंच आहे पहा.

**वासंती**—अगा रामदेवा, मी अगोदरच दुःखानें भाजलें आहें. त्यांत अशा मर्मभेदक प्रलापांनीं मज प्रियसखीला कां बरें आणखी भाजतोस ?

**सीता**—सखे तमसे, मला येथून दूर सरावेंसें वाटतें. पहा, चिरकाळेंकरून अनुभवास आलेला जो प्राणनाथाचा स्पर्श तो जरी सौम्य शीतळ आहे तरी त्यानें माझें सर्वांग संतप्त झालें. माझ्या हातास कंप सुटला, माझ्यानें वेदना

---

१ अमृताच्या लेपांनीं.

सोसवत नाहीं. खिळल्याप्रमाणें माझा हात जड झाला, तो माझ्या स्वाधीन राहिला नाहीं. आतां काय करावें ?

( इकडे रामचंद्र वासंतीस ह्मणतो. )

राम०—सखे, प्रलाप कशाचे. सत्यच आहे.

श्लोक.

विवाहामध्यें जो संवलय[1] करें प्यांच धरिला ॥
गमे स्वेच्छास्पर्शें अमृतमधुरें[2] तोच पहिला ॥

सीता—प्राणनाथा आतां ही तोच तूं आहेस ?

राम०—( उत्तरार्ध ह्मणतो. )

प्रियेचा हा पाणी[3] मज अनुभवानें समजला ॥
पुन्हा झाला दैवें मृदु सुखकर प्राप्त मजला ॥ ५१ ॥

असें ह्मणून आपल्या हातानें सीतेचा हात धरतो.

सीता—हाय हाय, प्राणनाथाच्या स्पर्शानें मी मोहित झाल्यामुळें मजकडून मोठा प्रमाद झाला !

राम०—अगे सखी वासंती,आनंदाच्या भरानें माझीं सर्व इंद्रियें जड झालीं आहेत. मी आनंदाच्या स्वाधीन झालों. मला पुरतें समजत नाहीं. ह्यासाठीं तूं तरी हिला पुरतेपणीं ओळख बरें.

वासंती—( मनांत ह्मणते. ) काय कपाळ सांगावें, येथें कशाची सीता आणि कशाचा स्पर्श! ही सारी दुःखशोकांतली बडबड दिसते.

सीता—( इतक्यांत त्वरेनें आपला हात ओढून घेऊन पाठीमागें सरते. )

राम०—हाय हाय धिक्कार असो. हें कसें झालें ?

---

१ कंकणसहित. २ अमृतासारखा मधुर जो साहजिक स्पर्श त्यानें. ३ हस्त.

## आर्या.

सहसा माझ्या हस्तापासून कसा तिचा कर निघाला ॥
जड कंपित घर्मप्लुत कर दोघांचाहि एकदा झाला ॥ ५२ ॥

**सीता**—हाय हाय, अद्यापि ह्याची दृष्टि स्तब्ध आणि अव्यवस्थित दिसते. हा अजून देहभानावर येत नाहीं. आतां काय करावें ?

**तमसा**—( स्नेहभावानें सीतेकडे पाहून ह्मणते, )

## अभंग.

होतां प्रियस्पर्श हिला ॥ कंप आंगासी सूटला ॥ ५३ ॥
घामें सर्वांगीं भीजली ॥ तनू रोमांचीत झाली ॥ ५४ ॥
जैशी कदंबाची शाखा ॥ आल्या जीवरी कळिका ॥ ५५ ॥
वायुवेगें जी हालली ॥ मेघोदकें ही भीजली ॥ ५६ ॥
तैसी भासे ही गोरटी ॥ दूर झाली उठाउठी ॥ ५७ ॥

**सीता**—काय सांगावें! ह्या पराधीन आत्म्यानें ह्या सखी तमसेपासून मला फार लाजविलें. ही खचीत ह्मणेल कीं, तो परित्याग काय, आणि हा स्नेहातिशय काय ?

**राम०**—( चोहोंकडे पाहून ) काय, नाहींशी झाली ? अगे निर्दये जानकी!—

**सीता**—मी खरीच निर्दय आहें. कांकीं, जी मी तुला दुःखित पाहून प्राणधारण करतें !

**राम०**—हे देवी, हे प्राणप्रिये जानकी, तूं कोठें आहेस ? कृपा करून मला एकवार दर्शन दे. अशा समयीं माझा त्याग करणें तुला योग्य नाहीं.

---

१ कदंबवृक्षाची डाळी. २ जानकी, ३ त्वरेनें.

### पद ५८.

गे सखि लोभ तुझा हा लटिका ॥ ध्रुवपद. ॥ स्पर्श करुनि मज, गेलिस कोठें ॥ लावुनि त्वद्दया चटका ॥ गे सखि लोभ तुझा० ॥१॥ तुज कोठें मी, पाहूं आतां ॥ जाते युगसम घटिका ॥ गे सखि लोभ तुझा हा० ॥ २ ॥ विरहाग्नीनें, अंतरिं जळतों ॥ दे वचनामृत घुटका ॥ गे सखि लोभ तुझा हा० ॥ ३ ॥ मायानरतनु, राम तयाला ॥ दिधला मोहें झटका ॥ गे सखि लोभ तुझा हा लटिका ॥ ४ ॥

सीता—अहो प्राणनाथ, हें असें विपरीत भाषण काय बोलतां?

वासंती—रामदेवा, आतां कृपा करावी. तुमच्या शोकाची पराकाष्ठा झाली. माझ्यानें ऐकवत नाहीं. आतां कांहीं विवेक करा, आणि लोकोत्तर धैर्य धरून तुह्मीच आपल्या अंतःकरणाचें समाधान करून घ्या. अहो माझी प्रियसखी जानकी आतां येथें कोठून येणार बरें? ही व्यर्थ भ्रांति आहे.

राम०—खरेंच कायगे, ती नाहीं येथें? हो हो नसेल खरी. असती तर वासंतीच्या दृष्टीस पडतीना का? तर काय मला हें स्वप्न पडलें ह्मणावें? पण मी झोंपीं गेलों नाहीं. ह्या रामाला झोंप कोठून येणार. मला वाटतें बहुतकरून तोच प्रियेचा वियोग अनेकवार मनांत आणल्यानें पुनः पुन्हा मला मोहांत पाडतो.

सीता—म्यांच कठिणत्हृदयेनें प्राणनाथास शोकांत घातलें!

वासंती—हे रामदेवा, इकडे पहा.

### ओंव्या.

येथेंच पहा रावणाचा ॥ रथ असे कृष्णलोहाचा[1] ॥

---

१ पोलादाचा.

जटायूनें चुराडा त्याचा ॥ करूनियां टाकिला ॥ ५९ ॥
रामा पहा हे समोर ॥ खरादि दैत्यांचे संभार ॥
ज्यांचा केला तुवां संहार ॥ तेच अस्थिशेष राहिले ॥ ६० ॥
खड्गें छेदूनि पंक्षतीतें[1] ॥ घायाळ करूनि जटायूतें ॥
वेगें घेऊनि सीतेतें ॥ रावण येथूनि निघाला ॥ ६१ ॥
विद्युल्लतासहित घेन[2] ॥ जैसा अवलंबी गगन ॥
स्कंधीं वाहोनि सीतारत्न ॥ व्योमपंथें उडाला ॥ ६२ ॥

**सीता**—( भय पावून. ) धांवा धांवा, हा दुष्ट पहा मामाजीचे प्राण घेतो, आणि मला हिरोन नेतो. आमचें रक्षण करा.

**राम०**—( ऐकून वेगानें उठतो. ) हा दुष्टा, माझ्या ताताचे प्राण घेणाऱ्या आणि माझ्या प्रियेचा अपहार करणाऱ्या कोठें चाललास ? मारतों तुला पहा आतां.

**वासंती**—बा रामा,राक्षसकुलाच्या संहारकर्त्या, तो दुष्ट राक्षस अद्यापि तुझ्या क्रोधास विषय आहे काय ?

**सीता**—अरेरे काय मीं उन्मत्तासारखी बडबड केली ही !

**राम०**—आतां ही म्यां भलतीच बडबड केली ! विरहाच्या अतिशयित दुःखामुळें मला भान राहिलें नाहीं.

### साकी.

कैसा दुःखातें साहूं ॥ कोठें सीतेला पाहूं ॥ ध्रु ॥
पूर्वीं दैवें मजला झाला, स्त्रीचा वियोग जेव्हां ॥
होते भेटवयास तीतें, शतशा उपाय तेव्हां ॥ ६३ ॥
पुढच्या आशेवर म्यां बहुधा, कालक्रमणा केली ॥
आतां तीच्या भेटीचीही, आशा नाहीं उरली ॥ ६४ ॥
मेळविलें म्यां वानरबळ तें, सेतु सागरीं रचिला ॥

---

१ पक्षमूलातें. २ मेघ.

आतां कोणा सहाय घेऊं, धीरचि माझा खचला ॥ ६५ ॥
तेव्हां शत्रूशीं म्यां दारुण, युद्धप्रसंग केला ॥
आतां कोणाशीं मी भांडूं, न सुचे उपाय मजला ॥ ६६ ॥
प्राणसखीचा म्यां दुर्भाग्यें, बुद्ध्या केला त्याग ॥
लावूं कोणा दोष अतां मी, हें माझें अत्याग ॥ ६७ ॥
सीतामुक्तीकरितां रामें, दशवदनाशीं केलें ॥
घोर युद्ध हें सर्वजनाला गाया कौतुक झालें ॥ ६८ ॥
पहिला वियोग रिपुघातावधि, होता उघडच लोकीं ॥
आतांचा हा निरवधि आहे, घालिल दुःसह शोकीं ॥ ६९ ॥

सीता—हाय हाय, हा वियोग निरवधि आहे काय ? जळो माझें जीवित, काय मी मंदभाग्या ही ! ( रडूं लागते. )

राम०—हाय हाय, काय हो संकट हें !

### दिंड्या दोनचरणी.

व्यर्थ जेथें सुग्रीवसख्य व्हावें ॥
वानरांचें ही वीर्य वृथा जावें ॥ ७० ॥
जांबवंता न स्फुरे बुद्धि कांहीं ॥
वायुपुत्राची गती जेथ नाहीं ॥ ७१ ॥
विश्वकर्म्याचा पुत्र नळ त्याची ॥
मार्ग करण्याला शक्ति नाहिं साची ॥ ७२ ॥
लक्ष्मणाचे शर जेथ जाति वायां ॥
प्रिये असशी कोणत्या अशा ठायां ॥ ७३ ॥

सीता—ह्या भाषणावरून तो पूर्वीचा विरह बरा ह्मणवितो खरा.

राम०—सखी वासंती,- ह्या रामाचें दर्शन तुह्मांसारख्या सुहृज्जनांस दुःख देणारें आहे. हें किती वेळ तुह्मांला रडवील

---

१ अपराध. २ मारुतीची.

न कळे. ह्यासाठीं आतां मला जाण्यास अनुमोदन द्यावें हें बरें.

**सीता**—( उद्विग्न आणि मोहित होऊन तमसेच्या गळ्यास मिठी मारून ह्मणते. ) सखे तमसे, प्राणनाथ चालला किंगे ?

**तमसा**—वत्से जानकी, सावध हो. धीर धर. जाऊं दे गेला तर. आपणही त्या आयुष्मंत कुशलवांचें वाढविसाचें मंगलकार्य संपादायास भागीरथीच्या पायांजवळ जाऊं चल; ऊठ.

**सीता**—बाई तमसे, कृपा करून अंमळ थांब. ह्या प्रियजनाचें पुन्हा दर्शन दुर्लभ आहे. ह्यासाठीं क्षणभर आणखी पाहूं दे.

**राम०**—असो-ह्यासमयीं तर अश्वमेधकर्म संपादावयास मला दुसरी धर्मपत्नी आहेच.

**सीता**—( मनांत ह्म० ) आँ-प्राणनाथा, तो कोण ?

**राम०**—(पूर्वोक्तवाक्य संपवितो.) ती सीतेची सुवर्णमयी प्रतिमा.

**सीता**—( मनास धीर देऊन डोळ्यांवाटें अश्रु काढून ह्म० ) कसा झाला तरी माझा प्राणनाथ दयाळू खरा. परित्त्यागामुळें माझ्या त्दृदयांत जें लज्जाशल्य सलत होतें तें आज प्राणनाथानें काढून टाकलें.

**राम०**—तेथें तरी ह्या प्रकारें अश्रूंनीं भरलेल्या दृष्टीनेंच पाहून संतोष करून घेतों.

**सीता**—ती धन्यच होय. जी प्राणनाथास मानवली, आणि जी त्याच्या चित्तास विश्रांति देणारी झाली. असो इतका तरी माझ्या जीवास आधार मिळाला.

**तमसा**—( किंचित् स्नेहानें नेत्रांस पाणी आणून आणि सीतेला आलिंगून ह्म० ) काय गे वत्से जानकी, एकूण अशा रीतीनें तूं आपणास धन्य ह्मणवून घेतेस काय ?

**सीता**—( लाजून खालीं पाहते आणि मनां ह्म० ) ह्या तमसा-

बाईनें माझी थट्टा केली. बरें असो. प्रसंगच तसा आहे. ऐकून घेतलें पाहिजे.

**वासंती**—हे रामदेवा, तुमच्या जाण्याचा म्यां खोळंबा केला, हा मोठा मजकडून प्रमाद घडला. आतां जेणेंकरून पुढील कार्यांची हानि न होईल तसें करावें.

**सीता**—ह्या वेळेस वासंती मला प्रतिकूळ झाली. कां तर, तिनें प्राणनाथाला जाण्यास अनुमोदन दिलें.

**तमसा**—वत्से, चल तर आपणही जाऊं.

**सीता**—( मोठ्या कष्टानें ह्म० ) बरें तर तसेंच करूं.

**तमसा**—आपण जाऊं ह्मणतों, पण जावें तरी कसें ? तुझी अवस्था पाहिली तर.

## आर्या.

तृष्णादीर्घ[1] तुझें हें चक्षू दयितींच[2] रोंविलें[3] अढळ ॥
त्याचा महाप्रयासें करितां आकर्ष होइनाच ढळ ॥७२॥

**सीता**—प्राणनाथाच्या चरणकमलांस माझा वारंवार नमस्कार असो. हे चरण ज्याच्या पदरीं पुण्य नाहीं त्याच्या दृष्टीस कोठून पडणार ? ( असें ह्मणून मूर्छा पावते. )

**तमसा**—वत्से सावध हो, सावध हो. असें काय करतेस ?

**सीता**—( सावध होऊन ह्म० ) मेघांच्या आड जाणाऱ्या पूर्ण चंद्राचें दर्शन केवढा वेळ होणार आहे ? असो चला आतां.

**तमसा**—काय चमत्कारिक गोष्ट ही !

## श्लोक.

एकाच[4] भेद अवघे करुणारसाचे ॥

---

१ पाहण्याच्याइछेनें विस्तीर्ण. २ पतीचेठायीं. ३ आकर्षण. ४ एकाच करुण रसाचे हे सारे भेद.

आनंद शोक सुख मोह हि भास साचे ॥
आवर्त[1] बुद्बुद[2] तरंग[3] असे अनेक ॥
झाले विकार तरि तें जळ सत्य एक ॥ ७४ ॥

राम०—हे विमानराज, इकडे यावें.

( सर्व उठतात. )

( तमसा सीतेला आणि वासंती रामाला झ० )

श्लोक.

अवनि[4] ॥ अमरसिंधू[5] देवि आह्लांसमेता ॥
मुनि कुलपति तोही बाप ज्याचा प्रचेता[6][7] ॥
ऋषि कुलगुरु पत्नीयुक्त तोही वसिष्ठ ॥
सतत तुज समर्पू मंगलें जीं वरिष्ठ ॥ ७४ ॥

( मग सर्व निघून जातात. )

छायानामक तृतीय अंक समाप्त ॥

---

१ भोंवरा. २ बुडबुडे. ३ लाटा. ४ पृथ्वी. ५ गंगा. ६ वाल्मीकि. ७ वरुण.

# उत्तररामचरित्र नाटक.

## अंक ४.

स्थल:

वाल्मीकिऋषीचा आश्रम.

पात्रें.

| | |
|---|---|
| भांडायन .. .. .. .. .. | तपस्वी. |
| सौधातकी .. .. .. .. .. | त्याचा सोबती. |
| जनक . .. .. .. .. .. | मिथिलाधिपति. |
| अरुंधती .. .. .. .. .. | वसिष्ठपत्नी. |
| गृष्टि . .. .. .. .. .. .. | ह्या नांवाचा कंचुकी. |
| कौशल्या .. .. .. .. .. | राममाता. |
| लव .. .. .. .. .. .. .. | सीतापुत्र. |
| बटु ह्मणजे मुलें.... .. .. .. | लवाचे सोबती. |

(दोन तपस्वी येतात. एक भांडायन आणि दुसरा सौधातकी.)

**भांडायन**—हे सौधातके, आज पहा आमच्या वाल्मीकिमुनीच्या आश्रमास काय विलक्षण शोभा आली आहे ही! जिकडे तिकडे अतिथि-जनांची दाटी होऊन गेली आहे, आणि सर्व गोष्टींची तयारी चालली आहे. पाकशाळेंत तर क्षणभर विश्रांतिच नाहीं.

**श्लोक.**

नीवारपाक करितां पहिल्या उताची ॥
जी काढिती मधुर उष्णहि पेज त्याची ॥
सद्यःप्रसूतहरिणीस मिळे पियाला ॥
पीतावशिष्ट बहु आश्रमिच्या मृगाला ॥ १ ॥
उकरुनि वरि सर्पी घालितां ओदनातें ॥
घमघमितसुवासें व्यापिलें या वनातें ॥
बँदरसहित भाज्या घालुनी वेसवार ॥
शिजविति बटु त्यांचा सूटला गंध फार ॥ २ ॥

**सौधातकी**—हो खरेंच. आणखी एक, आज पिकलेल्या दाढ्या-मिशांचे ह्मातारे ह्मातारे मिळाले आहेत, हें आपल्या अनध्यायास विशेष कारण झालें आहे.

**भांडा०**—( हांसून. ) वाव्हारे सौधातके, वृद्ध गुरुजनांस त्वां येवढें मोठें विशेषण दिलें, हा त्यांचा मोठाच बहुमान झाला नव्हे ?

**सौधा०**—अरे भांडायना, सर्व ह्मातान्यांचा राजा असा जो हा आज अतिथि आला आहे हा कोण बरें? ह्याचें नांव काय?

**भांडा०**—सौधातके, काय अशी थट्टा करतोस ? अरे हा भगवान् वसिष्ठ ऋषि. हा अरुंधतीसहवर्तमान राजा दशरथाच्या स्त्रिया घेऊन ऋष्यशृंगाच्या आश्रमाहून येथें आला आहे, आणि तूं अशी बडबड काय करतोस ?

**सौधा०**—हों—हे वसिष्ठ-बावा काय ?

**भांडा०**—ह्यांत काय संशय ? तेच.

---

१ सांव्याचा भात. २ नवप्रसूत. ३ पिऊन उरलेली. ४ मृगास मिळेने. ५ तूप. ६ भातानें. ७ बोरकूट. ८ मसाला. ९ शिष्य. १० पाहुणा.

सौधा०—मीं ह्मटलें कीं, हा कोणी वाघ आहे, किंवा लांडगा आहे. कोण जाणे.

भांडा०—ऑं-काय ? काय ह्मटलें ?

सौधा०—नाहीं, ह्मटलें. त्यानें येताक्षणींच अगोदर आमच्या गुरूच्या घरची बिचारी कालवड मटकावली. ह्मणून मला संशय आला.

भांडा०—अरे, अतिथीला मांसानें मधुपर्क करावा असें शास्त्र आहे. ह्मणून कोणी श्रेष्ठ अतिथि आपल्या घरीं आला असतां गृहस्थाश्रमी त्याला कालवड किंवा गोऱ्हा अथवा बोकड मारून त्याचें मांस देतात. ह्या कृत्यास धर्मशास्त्रकर्तें परमधर्म असें मानितात.

सौधा०—तर मग तूं येथें बोलण्यांत सांपडलास.

भांडा०—कसारे सांपडलों. ?

सौधा०—सांगतों ऐक कसा तो. श्रेष्ठ अतिथि आला असतां मांसानें मधुपर्क करण्याचा सांप्रदाय आहे. ह्मणून वसिष्ठ स्वामी आले त्यांकरितां कालवड मारिली ह्मणतोस. असो; पण नुकताच राजऋषिजनक आला होता त्याला आमच्या वाल्मीकि गुरूंनीं दहीं आणि मध ह्यांनींच मधुपर्क केला, कालवड मारिली नाहीं हें कसें.

भांडा०—अरे बाबा- ज्यांनीं मांस सोडलें नाहीं त्यांचा विधि वेगळा, आणि ज्यांनीं मांस सोडलें त्यांचा विधि वेगळा. जनकराजानें सांप्रत मांसभक्षण वर्ज्य केलें आहे. ह्मणून त्याला दहीं आणि मध ह्यांनींच मधुपर्क केला, समजलास ?

सौधा०—कोणत्या कारणानें त्यानें मांस सोडलें ?

भांडा०—ज्या समयीं त्याची कन्या सीतादेवी हिचा तसा दुष्ट

परिणाम दुर्दैवें करून झाला असें त्यानें ऐकलें, तेव्हांपासून त्यानें वनवास अंगीकारून मांसाहार सोडला; आणि केवळ कंदमूलफलें ह्यांचाच आहार स्वीकारला. अशा रीतीनें तपश्चर्या करतां करतां चंद्रद्वीपतपोवनांत त्याचीं पुष्कळ वर्षें लोटलीं.

**सौधा०**—तर मग तो तप सोडून इकडे कशाकरितां आला ?

**भांडा०**—फार दिवसांचा प्रियमित्र वाल्मीकि मुनि ह्याला भेटण्याकरितां ह्मणून सहज इकडे आला.

**सौधा**—आला, बरें झालें. पण आज त्याच्या विहिणींची आणि त्याची भेट झाली का ?

**भांडा**—आतांच वसिष्ठानें अरुंधतीबरोबर कौसल्या देवीस सांगून पाठविलें आहे कीं, तुह्मीं स्वतां जाऊन जनकराजाची भेट घ्यावी.

**सौधा०**—बरें तर आतां हे सर्व ह्मातारे ह्मातारे जसे एकत्र मिळून परस्पर आनंदानें गोष्टी सांगत आहेत, तसे आपणही सर्व विद्यार्थी एकत्र मिळून खेळण्यानें अनध्यायाचा आनंद अनुभवूं.

( असें ह्मणून दोघे इकडे तिकडे फिरतात. )

**भांडा०**—पहा हा ब्रह्मनिष्ठ पुराण राजऋषि जनकराजा प्रथम वाल्मीकि आणि वसिष्ठ ह्यांस भेटून आतां आश्रमाच्या बाहेर एका वृक्षाखालीं खिन्न होऊन बसला आहे.

**आर्या.**

त्द्हृदयस्थित शोकानें सीतेच्या होय नित्य आकलित[1] ॥
अंतर्गतवन्हीनें होतो जैसा वनस्पति[2] ज्वलित ॥ ३ ॥

---

१ व्याकुळ.   २ वृक्ष.

( मग दोघे निघून जातात. )

( इतक्यांत जनकराजा येतो. )

जनक—( खिन्न होऊन आपणाशीं बोलतो. )

### श्लोक.

कसें माझ्या कन्येवरि दुरित दैवें उभवलें ॥
जयाच्या योगानें दृढ ह्रदय माझें उकललें ॥
नवा धारावाही तरुवरि जसा करवत फिरे ॥
तसा कापी मर्मा सतत परि ह्या ताप न सरे ॥ ४ ॥

काय कष्ट तरी हे झातारपणीं ! ह्या जरेनें आणि त्या मुलीच्या दुःखानें, तसेंच उपोषणाच्या नियमांनीं सर्व धातु शुष्क होऊन हा माझा देह अत्यंत क्षीण झाला आहे, तरी अद्यापि पतन पावत नाहीं. काय करावें ! बळेंच प्राणत्याग करावा तर ऋषि सांगतात कीं, जे आत्मघाती पुरुष आहेत त्यांस उत्तम गति नाहीं. ते अंधतामिस्र लोकाप्रत जातात. तेव्हां तसेंही करतां येत नाहीं. आतां किती काळ पर्यंत हें दुःख भोगावें लागेल नकळे. जरी त्या गोष्टीस बहुत वर्षें लोटलीं तरी प्रतिक्षणीं स्मरण झाल्यामुळें नवीना सारखा भासतो असा हा दुःखवेग अजून शांत होत नाहीं. अगे बाई देवयजनसंभवे सीते, तुझी येवढी योग्यता असतां तुझ्या वांट्यास अशी गोष्ट यावी काय ! असो दैवास तूं काय करशील. ह्यामुळें मला लोकांत तोंड दाखवायास लाज वाटते, आणि गळा मोकळा करून पोटभर रडूं ह्मटलें तरीही अडचण. काय सांगूं, हाय हाय तुझें बाळपणचें चिमणें तोंड अजून डोळ्यांपुढें दिसतें.

---

१ पातक २ आलें. ३ तीक्ष्णधारेचा.

### दिंड्या.

बाइ माझे लाडके सिताबाई ॥
बाळपणचें कौतूक सांगु काई ॥ ५ ॥
बाळपणीं पाहतां तुझें मूख ॥
होय मजला तें काय वदूं सूख ॥ ६ ॥
विनाकारण रोदन हास्य यावें ॥
तिहीं वदनातें फार शोभवावें ॥ ७ ॥
थोड थोड्या कोंवळ्या दंतपंक्ती ॥
जया माजी उगवल्या शुभ्र कांती ॥ ८ ॥
जयापासुन बोबडे बोल गोड ॥
निघुनि माझें पुरविती सर्व कोड ॥ ९ ॥

हे भगवती वसुंधरे, तूं तिची जननी असून कितीगे कठोरत्हृदयाची झालीस ! पहा.

### श्लोक.

तूं वन्हि गंगा मुनि ही वसिष्ठ ॥
अरुंधती भास्कर हे वरिष्ठ ॥
होतां तुह्मी जाणत शील जीचें[1] ॥
तिला असें दूषण ? दैव तीचें ॥ १० ॥

### आर्या.

सांद्वयेतें वाणी देवीशी मसवलीस तूं जीतें ॥
त्या अपुल्या कन्येच्या कैसें त्वां साहिलें विपत्तीतें ॥ ११ ॥

( पड्यापलीकडे शब्द होतो. )

अहो भगवतीहो अहो महादेवीहो इकडे यावें.

---

१ ज्या सीतेचें.

**जनक**—गृष्टिनामक कंचुकीनें दाखविलेल्या मार्गानें येत आहे ही कोण ? हां—वसिष्ठपत्नी अरुंधती काय ? ( उठून उभा राहतो. ) महादेवी ही कोण ? ( निरखून पाहतो. ) अहो ही राजादशरथाची धर्मपत्नी आणि माझी प्रियसखी कौसल्या ! कायहो हिची दशा झाली ही ? तीचही असें कोणखरें मानील ?

## श्लोक.

घरीं दशरथाचिया वसत होति लक्ष्मीपरी ॥
कशास उपमा तिची उघड हीच लक्ष्मी खरी ॥
परंतु परकी जशी तशिच भासते ही मला ॥
दशा कशि दिली पहा कठिण दैवयोगें हिला ॥ १२ ॥

अरे दैवयोगानें हा निराळाच विपर्यास झाला.

## आर्या.

जो जन पूर्वी होता नयनातें मूर्तिमंत उत्सवसा ॥
त्याचें दर्शन आतां असह्य झालें क्षतांत खार जसा ॥ १३ ॥

( इतक्यांत अरुंधती, कौसल्या आणि कंचुकी येतात. )

**अरुंधती**—बाई कौसल्ये, मी ह्मणतें हें ऐकावें. तूं स्वतां जाऊन जनक राजाची भेट घ्यावी अशी तुमच्या कुलगुरूची आज्ञा आहे. ह्यासाठींच त्यानें मला तुजकडे पाठविलें आहे. तो जनक राजा बसला आहे पहा, चल त्याजकडे. अगे आतां पदोपदीं किती खेद करशीलतरी ?

**कंचुकी**—बाईसाहेब, आतां अंतःकरण आंवरून धरून गुरुजींच्या आज्ञे प्रमाणें करावें, अशी माझीही विनंती आहे.

**कौसल्या**—हरहर, अशासमयीं मिथिलाधिपतीची भ्यां भेट घ्यावी असा प्रसंग आला पहा. दैवानें सर्व दुःखें एकदां-

च कशीं उभीं केलीं हीं? ह्यानें जानकीचें वर्तमान विचारलें तर मीकायउत्तर करूं? माझें अंतः करण चलित झालें तें स्थिर करण्यास मी समर्थ नाहीं.

अरुंध०—खरेंच गे बाई, ह्यांत काय संदेह.

श्लोक.

जरी वाटती नित्य दुःखें वियोगें ॥
प्रिया बंधुच्या जाहलीं दैवयोगें ॥
तरी पाहतां इष्टमित्रास होती ॥
अतीदुःसहें कीं तया पूर येती ॥ १४ ॥

कौस०—त्या वत्से जानकीची तशी अवस्था झाली असतां आतां म्यां राजर्षिजनकाला कसें तोंड दाखवावें! आणि त्यासीं काय बोलावें?

अरुं०—( तिचें सांत्वन करून तिला ह्मणते. )

श्लोक.

हा तुझा श्लाघ्यसंबंधी जनकांचा कुलाग्रणी ॥
याज्ञवल्क्य मुनी ज्याला ब्रह्मविद्या सदा कथी ॥ १५ ॥

कौस०—( मनांत ह्म० ) हाच तो महाराजांचा मूर्तिमंत ह्दयानंद, आणि त्या मुलीचा पिता राजर्षि जनक. हायहाय, काय सांगावें, त्या विवाहसमारंभांत ह्यानें आमचा किती सत्कार करावा! हारे दैवा आज तें सारें नाहींसें झालेंना?

जनक—( पुढें होऊन जवळ जाऊन. ) हे भगवती अरुंधती, हा सीरध्वजनामा वैदेह तुजप्रति अभिवंदन करतो.

श्लोक.

निधी जो तेजांचा कुलगुरु रघूंचा तपतसे ॥
जिच्या योगें तो ही निजतनु विशुद्धा ह्मणतसे ॥
जगद्वंद्या ती तूं प्रथम जशि संध्या विनवितों ॥
तुला हा मी डोई अवनिवरि ठेवूनि नमितों ॥ १६ ॥

**अरुं०**—हे राजा, परब्रह्म तुला प्रकाशित असो, आणि अंबरीं-तपतो जो देव सविता तो तुला पावन करो.

**जनक**—हे कंचुकी, प्रजापालकाची माता तुझी धनीन कौसल्या खुशाल आहेना ?

**कंचुकी**—महाराज, प्रजापालकाची माता ह्या साहजिक बोलण्यानें आपण आमची बरीच निर्भर्त्सना केली. पण हे राजर्षे, थोडक्या दिवसांपासून रामभद्राच्या मुखचंद्राचें दर्शन हिला नाहींसें झाल्यामुळें ही अगोदरच दुःखित झाली आहे. तशांत तें वैषम्य मनांत ठेवून उपरोधिक भाषणानें हिला आणखी दुखवावें हें तुह्मांस योग्य नाहीं.—रामभद्रास दोष लावावा तर जानकीची अग्निशुद्धि खरी न मानितां भलतीच दुर्वार्ता लोकांनीं चोहोंकडे उठविली. तेव्हां तसें निष्ठुर कर्म करणें त्यास प्राप्त झालें. त्यानें काय करावें. हा त्याच्या दैवाचाच योग ह्मणावा.

**जनक**—आँः—माझ्या कन्येला अग्नि शुद्ध करतो काय ? आणि माझ्या कन्येविषयीं लोकांनीं अशी दुर्वार्ता बोलावी काय? असो रामानेंच आमचा तिरस्कार केला मग लोक सहजच करतील.

---

१ सूर्य. २ वसिष्ठ. ३ सूर्यआणि वसिष्ठही ४ उदयसंध्या तशीतूं. ५ भूमीवरि.

**अरुंध०**—होय. हें खरेंच आहे. सीतेला अग्नीनें शुद्ध केलें हें ह्मणणें अगदीं अयोग्य दिसतें. हे वत्से जानकी.

### श्लोक.

शि[1]ष्या सुता हें मजशींच नातें ॥
लावीत होतीस असो अतां तें ॥
[2]त्या शुद्धिनें त्वद्विषयीं विचित्र ॥
झाली मला भक्ति हि तूं पवित्र ॥ १० ॥

### श्लोक.

शिशुत्व कीं स्त्रीत्व असो कशाला ॥
आहेस तूं वंद्य जगत्रयाला ॥
लोकीं गु[3]णीचे गुण पूज्य होती ॥
[4]प्रमाण नाहीं व[5]यें लिं[6]गें जा[7]ती ॥ १८ ॥

**कौसल्या**—असें काय होतें हें ? एकाएकीं माझ्या सर्वांगांत वेदना उठल्या. ( असें ह्मणून मूर्छा पावते. )

**जनक**—काय संकट हें ! अहो ह्या बाईला हें काय झालें ?

**अरुंध०**—हे राजर्षे दुसरें काय व्हावयाचें ?

### श्लोक.

तो राजा सौख्य ही तें सुखद दिवस ते तीं मुलें तीं हि बाळें ॥
आलें सारें स्मृतीतें प्रियसुहृदजना पाहतां दीर्घकाळें ॥
ऐशा दुःखांत तूझ्या सहजचि सखिचें नष्टलें सर्व भान ॥
माया चित्त स्त्रियांचें मृदुलचि असतें जातिपुष्पासमान ॥ १९ ॥

---

१ माझी शिष्या आणि सुता तूं ह्मणवीत होतीस. २ अग्निशुद्धीनें. ३ गुणवंताचे. ४ निमित्त. ५ वार्धक्यादि. ६ पुरुषादि. ७ब्राह्मणादि.

**जनक**—अरेरे, फार वाईट झालें! मी किती तरी निष्ठुर हा! कीं, माझ्या प्रियमित्राच्या स्त्रियांकडे स्नेहदृष्टीनें पाहत नाहीं.

**आर्या.**

संबंधी श्लाघ्य असे प्रिय मित्र तदीयचित्त ही विमळ ॥
साक्षाद्धृदयानंदचि संसारीं हें च वांचणें सुफळ ॥ २० ॥
प्राणाधिक देहाधिक जो जो प्रियतर पदार्थ वाटतसे ॥
त्याहूनि प्रियतम मज तो राजा दशरथाख्य काय नसे ॥२१॥

स्मरण झालें ह्मणजे दुःख होतें. तीच ही कौसल्या.

**श्लोक.**

कधीं होई यांचा [1]कलह [2]रहिं अन्योन्य [3]उगला ॥
तदा हीं [4]दोघें ही कठिणवचनें बोलत मला ॥
[5]किली कोपप्रीतीविषयिं [6]तयि माझ्या करिं वसे ॥
पुरे त्याचें आतां स्मरण ह्रदया भाजित असे ॥ २२ ॥

**अरुं०**—कायतरी कष्ट! फारवेळ श्वासाचा निरोध झाल्यामुळें ह्यादेवीचें ह्रदय किती कठिण झालें आणि कसें धडधड उडतें हें!

**जनक**—हा प्रियसखी कौसल्ये बाई, सावध हो.

( असें ह्मणून कमंडलूंतलें उदक तिच्या आंगावर शिंपडतो. )

**कंचुकी**—( मनांत. ) दैवाचा खेळ विचित्र आहे.

**आर्या.**

मित्रसुह्रद होउनि [6]जें दावी अनुकूलतेसि आधीं तें ॥
दैव अकाळीं निष्ठुर होउनि देतें मनास [7]आधीतें ॥ २३ ॥

---

१ प्रेमकलह. २ एकांती. ३ निष्कारण. ४ दशरथकौसल्या. ५ युक्ति. ६ जें दैव. ७ दुःखातें.

**कौसल्या**—( सावध होऊन ह्म० ) हा वत्से जानकी, कोठें गे आहेस ! तें तुझें मुखकमल मला वारंवार स्मरतें, जें विवाहलक्ष्मीचें मंगलस्थान आणि जें सलज्ज हास्यानें शोभमान पाहिलें होतें. तर आतां चंद्रिकातुल्य सुखप्रद अशा दैदीप्यमान सुंदर अंगांची शोभा मला दाखीव, आणि पुन्हा माझी मांडी एकवेळ बसून शोभितकर. तुझा श्वशुर जो महाराज तो वारंवार ह्मणत असे कीं, ही मुलगी रघुकुलांतील पुरुषांची सून झाली खरी, तरीही मित्रजनकाच्या संबंधानें आमची कन्याच आहे.

**कंचुकी**—कौसल्याबाई, तुह्मी ह्मणतां तें खरेंच.

श्लोक.

पांचां अपत्यांतहि जो नरेंद्र ॥
मानी विशेषें प्रिय रामचंद्र ॥
चारी सुनांमाजि तशीच सीता ॥
प्रिया जशी ती तनुजात शांता ॥ २४ ॥

**जनक**—हे प्रियसख्या राजा दशरथा, असाच तूं सर्व प्रकारें माझ्या त्द्दयास प्रियकर होतास. तें काय सांगावें ! तुला मी कसा विसरेन ?

श्लोक.

कन्येचे गुरु पूजितात विनयें त्या जांवयाच्या जना ॥
तें झालें उलटें तयीं करिशि तूं माझ्याच आराधना ॥
काळानें तुज ओढिलें विघडला संबंधहेतू तसा ॥
या घोरीं मज जीवलोकनरकीं धिक् वांचलों मी कसा ॥२५॥

**कौसल्या**-मुली जानकी,मीतरी काय करूं, हा मेला माझा जीव

---

१ वडील. २ सीतारूप.

दृढपणें जोडलेल्या पदार्था सारखा अचळ झाला आहे, ह्मणून मलाही दुर्भाग्येला तो सोडून जात नाहीं.

**अरुंध०**—हे राजपुत्री कौसल्ये, कांहीं धीर धर. अंमळसें डोळ्यांचें पाणी तरीं खळूंदे. आणखी तुला विचारित्यें, अगे तुला स्मरण नाहीं काय? ऋष्यशृंगाच्या आश्रमीं तुमचा कुलगुरु बोलला होता कीं, जी गोष्ट व्हावयाची ती झाली, परंतु पुढें सर्व प्रकारें कल्याण होईल.

**कौसल्या**—बाई अरुंधती, तें मला स्मरतें, पण ती गोष्ट मागें पडली असें दिसतें. आतां आशा उरली नाहीं.

**अरुंध**—हे राजपुत्री, तूं असें काय बोलत्येस? तें ऋषीचें भाषण मिथ्या असें तुला वाटतें काय? नाहीं नाहीं असें ह्मणूं नको. हे सुक्षत्रिये, त्या प्रमाणें होईलच होईल. ह्यांत संशय नाहीं.

**श्लोक.**

ज्यांचें मोठें तेज त्या ब्राह्मणांच्या ॥
उक्ती[1] होती संशया वीण[2] साच्या[3]
वाचा त्यांची होय कल्याणखाणी ॥
कद्धीं ते नोच्चारिती व्यर्थवाणी ॥ २६ ॥

(इक्यांत पडद्यापलीकडे गलबला होतो. सर्व कान देऊन ऐकतात.)

**जनक**—वाटतें आज शिष्टागमनानें अनध्याय झाल्या मुळें सर्व विद्यार्थी खेळत आहेत. त्यांचा हा गलबला!

**कौसल्या**—बाळपणांतील सौख्य मोठें मौजेचें आहे. (निरखून-पाहून.) अहो ह्या मुलां मध्यें हा माझ्या रामभद्रा सारखा दिसतो हा कोण बरें? याच्या आंगाची ठेवण त्याच्याच-

१ वाक्यें. २ निःसंशय. ३ खऱ्या.

सारखी सुंदर आणि मनोहर आहे. याला पाहून समाधान वाटतें.

**अरुंध०**—(एकीकडे तोंड करून, व आनंदाश्रू डोळ्यांत आणून ह्म०) भागीरथीदेवीनें अमृता सारखी जी गुप्त गोष्ट पूर्वीं सांगितली होती ती हीच बरें. परंतु त्या आयुष्मंत कुशलवां मध्यें हा कोण आहे हें कळत नाहीं.

**जनक**—खरेंच, ह्या मुलास पाहून मला ही फार समाधान वाटतें.

### श्लोक.

नीलोत्पला सदृश कांति, शिखंड[1] साजे ॥
हा मंडळींत बटुंच्या[2] स्वयशें विराजे ॥
वाटे पुन्हा शिशुच होउनि राम आला ॥
कीं पाहतां च नयना निववी मनाला ॥ २७ ॥

**कंचुकी**—हा मुलगा खचित क्षत्रियब्रह्मचारी आहे. याचीं चिन्हें तशींच दिसतात. पहा

### ओंव्या.

पृष्ठीं बांधले भाते दोन ॥ माजी भरले बहूत बाण ॥
त्या वरी चूंडा[3] लंबमान ॥ सुटोनियां रुळताहे ॥ २८ ॥
धनुष्याची दोरी विचित्र ॥ तिचें केलें असे कटिसूत्र ॥
मंजिष्ठानें रंगविलें वस्त्र ॥ अंगा वरी घेतलें ॥ २९ ॥
वामकरीं भव्य कोदंड[4] ॥ दक्षिणहस्तीं अश्वत्थदंड ॥
रुद्राक्षांचीं वलयें अखंड ॥ मणगटा[5] माजी शोभती ॥ ३० ॥
भस्म माखिलें सर्वांगीं ॥ मृगचर्म धरिलें ऊर्ध्व भागीं ॥
कौपीन असे अधोभागीं ॥ ब्रह्मचारी लक्षण हें ॥ ३१ ॥

---

१ झुबपें. २ मुलांच्या. ३ शेंडी. ४ धनुष्य. ५ मणगट्या.

बाई अरुंधती, हा कुठला कोण या विषयीं कांहीं तुह्मांस तर्क होतो काय ?

**अरुंध०**—आह्मी तरी आजच आलों. आह्मांस काय कळे ?

**जनक**—हे कंचुकी, या मुलाला पाहून मला फारच कौतुक वाटतें. तर तूं वाल्मीकि मुनी कडे जाऊन त्याला विचार, कीं, हा कोण आहे. आणि त्या मुलालाही सांग कीं, कोणी वृद्धवृद्ध आले आहेत ते तुला बोलवितात.

**कंचुकी**—आज्ञे प्रमाणें करतों. ( असें ह्मणून निघून जातो. )

**कौसल्या**—काय ह्मणतां ? असें सांगितलें ह्मणजे तो येईल काय ?

**अरुंध०**-हें जातिवंताचें लेंकरूं आहे. ह्याच्या सुवर्तनांत अंतर पडेल काय ? तो कधीं वांकडा जाणार नाहीं.

**कौसल्या**—(चिंतन करून ह्म०) कसा पहा तो मुलगा कंचुकीनें सांगितलेला निरोप ऐकतांच ऋषिकुमारांस सोडून विनयानें इकडे यावयास निघाला. हा आला पहा.

**जनक**—( फार वेळ त्या कडे निरखून पाहून ह्मणतो ) अहो विलक्षण रूप हें !

श्लोक.

वसे रानीं, भासे शिशु, परि असे हा गुणनिधी ॥
कळे हें सुज्ञाला त्वरित परि अज्ञास न कधीं ॥
पहातां आकर्षी स्थिर हि मन माझें लघुपणीं ॥
जडाही लोहाला झडकरि जसा चुंबकमणी ॥ ३२ ॥

( इतक्यांत लव पुढें येतो. )

**लव**—( आपल्या मनांत ह्मणतो. ) हे सारे वृद्ध मला पूज्यच आहेत, परंतु यांचीं नांवें यांचे अधिकार व यांचा क्रम म-

---

१ बाळपणांतही.

ला ठाऊक नाहीं. तेव्हां आपण यांस अभिवंदन कोणत्या-प्रकारें करावें बरें! (क्षणभर विचार करून) असो. जो, वंदन प्रकार अविरुद्ध आहे, असें थोर ह्मणतात तोच आपण करावा ह्मणजे झालें. ( जवळ जाऊन, ) हा तुह्मासर्वांस अनुक्रमें करून माझा लवाचा शिरसा प्रणाम असो.

**अरुंधती आणि जनक**--मुला दीर्घायुषी हो.

**कौसल्या**—बाळा, चिरकाळ वांच माझ्या जिवा.

**अरुंध०**—लेंकरा, इकडे ये. ( त्याला उचलून मांडी वर घेत्ये आणि त्या कडे पाहून मनांत ह्मणत्ये ) यावेळेस केवळ माझी मांडी धन्य झाली इतकेंच नाहीं. चिरकाळेंकरून माझा मनोरथही पूर्ण झाला.

**कौसल्या**—बाळा,मज कडे पण एकदां ये. (उचलून मांडी वर घेत्ये. ) अहो, काय चमत्कार हा ! या मुलाचा नीलोत्पला सारखा श्याम वर्ण आणि कलहंसा सारखा कोमल, तसा घोगरा कंठस्वर, इतक्यानेंच केवळ हा माझ्या रामभद्राची बरोबरी करितो असें नाहीं. तर ? याचा कमलगर्भा सारखा मृदुस्पर्शही तसाच आहे. अहाहा? रामभद्र मांडी वर बसला असतां जें सुख व्हावें त्याच सुखाचा आज मी अनुभव घेत आहें असें मला वाटतें-—(त्यास ह्मणत्ये.) बाळा, आतां तुझें मुखकमल मला डोळे भरून पाहूं दे. ( हनुवटी उचलून मुखा कडे निरखून पाहून, डोळ्यांत अश्रू आणि मनांत कांहीं कल्पना आणून जनकास ह्म० ) हे राजर्षे जनका, आपण पुर्तेपणें पाहिलें काय या मुला कडे ? सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां वत्से जानकीच्या मुखचंद्राची कांहीं छटा याच्या मुखा वर दिसत्ये.

**जनक**-पाहतों बरें, प्रियसखी,तेंच पाहतों. मलाही तसेंच वाटतें.

कौसल्या—काय आश्चर्य हें ! माझें त्दृदय उन्मत्ता सारखें होऊन कांहीं तरीं मजकडून बडबड करवितें.

जनक—( त्या कडे निरखून पाहून ह्मणतो. )

श्लोक.

वत्सेची[1] अणि सूर्यवंशमणिची[2] या बालकीं आकृती ॥
संपूर्ण प्रतिबिंबिताच दिसते भासे तशीच द्युती[3] ॥
वाणी तीच दिसे तसा विनय ही सामर्थ्य ही तेंचसें ॥
हा दैवा भलती कडे भटकतें कां चित्त माझें असें[4] ॥ ३३ ॥

कौसल्या—मुला तुला आई आहे काय ? बरें तुझा बाप कोण हें तुला ठाऊक आहे ?

लव—नाहीं नाहीं. तें कांहीं मी जाणत नाहीं.

कौस०—तर मग तूं कोणाचा ?

लव—भगवान् वाल्मीकिऋषि यांचा.

कौस०—अरे बाळा, आह्मी ज्याअर्थानें विचारितों त्याचें उत्तर सांग.

लव—मला इतकेंच ठाऊक आहे. दुसरें मी जाणत नाहीं.

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो. )

अहो सैनिक हो आपला धनी कुमार चंद्रकेतु आज्ञा करितो कीं, खबरदार, कोणीं आश्रमभूमीच्या मर्यादेंत पाय ठेवूं नये.

अरुंधती आणि जनक-अहो आज मोठा सुदिन आहे, कीं, यज्ञसंबंधी अश्वाच्या रक्षण प्रसंगानें वत्स चंद्रकेतु इकडे तो आज आमच्या दृष्टीस पडेल.

---

१ जानकीची. २ रामचंद्राची. ३ कांति. ४ हें वाटणें भ्रांतीचें आहे.

**कौसल्या**—काय ह्मणतां ? माझ्या बाळा लक्ष्मणाचा पुत्र चंद्रकेतु आज्ञा करितो ? अहा हीं अमृता सारखीं गोड अक्षरें माझ्या कांनीं पडतात.

**लव**—अहो आजोबा, चंद्रकेतु ह्मणतां हा कोण बरें ?

**जनक**—दशरथ राजाचे पुत्र रामलक्ष्मण तुला ऐकून ठाऊक आहेत काय ?

**लव**—हे तर रामायण कथेंतील मुख्य पुरुष.

**जनक**—हो, खरेंच.

**लव**—मग ते मला कसे ठावके नसतील ?

**जनक**-तर मग त्याच लक्ष्मणाचा पुत्र हा चंद्रकेतु. समजलास?

**लव**—हाँ हाँ—एकून उर्मिलेचा पुत्र आणि मिथिलाधिपति जनक राजा यांचा दौहित्र हा ?

**अरुंध०**—( हांसून ह्मणत्ये, ) हा मुलगा रामायणकथेंत बराच प्रवीण दिसतो.

**जनक**—( विचार करून, ) बाळा, जर तूं रामायणकथेंत इतका प्रवीण आहेस तर मग मी विचारतों तें सांग बरें. दशरथराजाच्या प्रत्येक पुत्रास मुलें किती, त्यांचीं नांवें काय, आणि त्यांच्या आया कोणत्या ?

**लव**—हा कथाभाग मीं किंवा माझ्या सोबत्यांतून कोणींही पाहिला नाहीं व ऐकिला नाहीं.

**जनक**—काय त्या कवीनें हा कथाभाग लिहिलाच नाहीं ?

**लव**-लिहिला आहे, परंतु प्रसिद्ध केला नाहीं. पण त्याच भागांतील एक प्रकरण घेऊन त्याचा एक सरस नाटकग्रंथ केला आहे. तो स्वतां वाल्मीकि मुनींनीं आपल्या हातानें लिहून नाट्यशास्त्राचा आचार्य जो भरतमुनि त्याज कडे पाठविला आहे.

जनक—त्याज कडे कशासाठीं पाठविला बरें ?

लव—त्याणें अप्सरां कडून त्याचा खेळ करवावा ह्मणून.

जनक—या गोष्टीचें आह्मांलाही मोठें कौतुक आहे.

लव—आमचे गुरु वाल्मीकि मुनि यांना तर या विषयीं फारच आवड आहे. ह्मणून त्यांनीं विद्यार्थ्यांच्या हातीं तें पुस्तक देऊन भरताश्रमास पाठविलें आणि तें सुरक्षितपणें भरतमुनीस पावतें व्हावें ह्मणून त्याच्या संरक्षणार्थ हातीं धनुष्यबाण देऊन माझा भाऊ बरोबर दिला आहे.

कौस॰—बाळा, तुला भाऊही आहे काय ?

लव—होय एक भाऊ आहे.

कौस॰—त्याचें नांव काय ?

लव—त्याचें नांव कुश, पण मी त्याला दादा ह्मणतों.

कौस॰—एकून तो वडील आहे असें झालें.

लव—होय खरेंच. प्रसूतिक्रमानें ह्मटलें ह्मणजे तोच वडील होतो.

जनक—तर काय तुह्मी दोघे जुळे अहां ?

लव—होय जुळेच आहों.

जनक—बरें, त्या रामलक्ष्मणांची कथा कोठपर्यंत तुह्मीं शिकलां आहां ?

लव—लोकांनीं जानकी विषयीं खोटा अपवाद उठविल्या मुळें रामराजा उद्विग्नचित्त झाला, त्यानें ती जानकी नवांमहिन्यांची गरोदर असतां बाहेर घालविली, ती लक्ष्मणानें रामाच्या आज्ञे स्तव घोर अरण्यांत एकटी नेऊन सोडिली, आणि तो लक्ष्मण माघारा गेला एथपर्यंत.

कौस॰—हा वत्से जानकी, हा बालचंद्रवदने, तूं घोर अरण्यांत एकटी पडलीस त्या समयीं पुष्पा सारख्या तुझ्या सुकुमार

शरीराची कायगे दशा झाली असेल. हरहर, दुर्दैवानें तुझा परिणाम कोणत्या प्रकारचा केला असेल तो असो.

**जनक०**—हा वत्से, त्या वेळीं तुझी काय अवस्था झाली असेल?

श्लोक.

जेव्हां तुझ्या वर भयंकर वेळ आली ॥
जेव्हां व्यथा प्रसवकाळकृता हि झाली ॥
जेव्हां असेल तुज वेढियलें भुतांनीं ॥
तेव्हां मला स्मरत तूं असशील रानीं ॥ ३४ ॥

**लव**—( अरुंधती कडे वळून हळूच विचारितो. ) अहो बाई, हीं उभयतां वारंवार दुःखित होतात हीं कोण आहेत ?

**अरुंध०**—ही रामाची माता कौसल्या, आणि हा रामाचा श्वशुर राजा जनक.

**लव**—हांहां असें काय ? ( विनयानें, कौतुकानें, आणि खेदानें त्यांज कडे पाहतो. ) ठीकच आहे.

**जनक**—कायहो लोकांचा अमर्याद दुष्ट स्वभाव हा, आणि त्या रामराजाची तरी काय ही अविचाराची त्वरा ! ( क्रोधाविष्ट होतो. )

श्लोक.

हें दुःखात्मक घोर वज्र शिवलें शश्वत् जयाच्या उरा ॥
त्या माझ्या भडकावया अवसर क्रोधानळा हा खरा ॥
घ्याया योग्य करीं असे समय हा चापास शापास वा ॥
या काळीं मजला निवारिल बळें कोणी असा दाखवा ॥ ३५ ॥

**कौस०**—बाई अरुंधती. हा राजर्षि क्रोधाच्या स्वाधीन झाला आहे असें दिसतें. तर याचे सांत्वन करून सर्वांचें रक्षण कर.

**अरुंध०**—राजा, शांत हो, असा कोप करूं नको.

श्लोक.

जे योगियांचा करितात मंतू ॥
हा दंड त्यां योग्य असे परंतू ॥
आहे तुला राम अपत्यतुल्य ॥
दीना प्रजा त्याहि तशाच पाल्यें ॥ ३६ ॥

जनक-(मनांत विचार करून शांत होऊन ह्मणतो) तेंही खरेंच.

श्लोक.

आहे खराच रघुनंदन पुत्रकल्पें ॥
स्त्री बाळ वृद्ध विकल द्विजलोक अल्पें ॥
होवो प्रशांत मम चाप तसाच शाप ॥
भावो चुके न जरि ये विधिचाहि बापें ॥ ३८ ॥

( इतक्यांत धांवत धांवत मुलें येतात. )

मुलें—हे कुमारा लवा, अश्वअश्व ह्मणून यज्ञ प्रकरणांत सांगितलेला प्राणिविशेष लोकांत आहे असें ऐकत होतों तो आज आम्हीं प्रत्यक्ष पाहिला.

लव—यज्ञप्रकरणांत अश्व सांगितला आहे, तसा युद्ध प्रकरणांतही अश्व सांगितला आहे. पण तुह्मी पाहिला तो कसा आहे सांगा.

मुलें—ऐक कसा आहे तो सांगतों.

श्लोक.

मोठें पुच्छ असे तयाच वरिचें तो तें सदा हालवी ॥
ग्रीवा दीर्घ जटाल चार खुर ही वेगें तयां चाळवी ॥

---

१ अपराध. २ पालन योग्य. ३ पुत्रतुल्य. ४ तुच्छ. ५ होणार.
६ ब्रह्मयाचा बाप साक्षात् विष्णु. ७ मान. ८ केशयुक्त.

खातो बालतृणें फळा सम सदा लेंड्यांस टाकीतसे ॥
तूतें दाखवितो उठीं लवकरी तो दूर गेला असे ॥ ३८ ॥
( असें ह्मणून लवाच्या जवळ जाऊन कोणी हात कोणी कृष्णाजिन धरून त्यास ओढतात. )

**लव**—(विनयानें आणि कौतुकानें ह्मणतो) अहो, गुरुजनहो, हे मला ओढून नेतात ह्मणून जातों. क्षमा असावी. ( असे ह्मणून त्वरेनें चालता होतो. )

**कौस०**—अहो अरुंधतीबाई. मला असें वाटतें कीं, हा मुलगा माझ्या दृष्टीच्या पलीकडे गेला असतां माझा जीव राहाणार नाहीं. या साठीं एथून दुसऱ्या ठिकाणीं उभें राहून हा चालला आहे याला पहावें. याला उदंड आयुष्य असो.

**अरुंधती आणि जनक**-हा बाळक आमचें कौतुक पुरवो.

**कौस०**-पहा तो चपळ मुलगा हरणा सारखा अतिवेगानें पळत दूर गेला. तो कसा दृष्टीस पडतो ?
( इतक्यांत कंचूकी येऊन सांगतो, ) अहो वाल्मीकि ऋषि सांगतात कीं, या समयीं तुह्मांस कांहीं सांगावयाचें आहे, तर तुह्मीं सर्वांनीं येऊन ऐकून घ्यावे.

**जनक**—हें कांहीं तरी नाजूक प्रकरण आहे असें वाटतें. तर हे भगवती अरुंधती, हे सखी कौसल्ये, हे कंचुकी, आपण आतां चला वाल्मीकि ऋषी कडे जाऊं.

( मग वृद्ध मंडळी निघून जात्ये. )

**मुलें**—हे कुमारा लवा, हा चमत्कारिक प्राणी पहा. आह्मीं सांगितला तो हाच.

**लव**—पाहिला, आणि हा कशाचा अश्व हेंहीं मी समजलों. हा अश्वमेधसबंधी अश्व आहे.

**मुलें**—हें कशा वरून तुला समजलें ?

लव-काय तुह्मी मूर्ख अहां. अरे अश्वमेधकांड तुह्मी वाचलें नाहीं काय? यज्ञसंबंधी अश्वाच्या संरक्षणास कवची धन्वी खड्गी असे शंभर शंभर वीर असावे ह्मणून त्यांत सांगितलें आहे तें तुह्मांला स्मरत नाहीं काय? त्याप्रमाणेंच हा अश्व आहे. तुह्मांस खोटें वाटत असेल तर तुह्मी त्यांस जाऊन विचारा.

मुलें—( सैनिकां कडे जातात.) अहो सैनिकहो, वीरांनीं वेष्टित असा हा अश्व कोणत्या कारणास्तव फिरत आहे सांगा.

लव—( स्पृहायुक्त होत्साता मनांत ह्मणतो ) अहा, अश्वमेध झटला ह्मणजे विश्वाचा जय इच्छिणाऱ्या क्षत्रियाच्या पराक्रमाची व उत्कर्षाची पराकाष्ठा झाली?

( पडद्या पलीकडून वीरांचा शब्द होतो. )

## आर्या.

ही हयरूपपताका अथवा ही वीरघोषणा त्याची ॥
जो एकवीर सप्तहि लोकांत तया दशास्यहंत्याची ॥ ३९ ॥

लव—( चित्तास तें भाषण लागून व्यथित झाल्या सारखा होऊन ह्मणतो ) अहो हीं अक्षरें त्द्दयास जाळतात.

मुलें— अरे लवा, तूं केवळ वेडा आहेस. हें काय बोलतोस?

लव—थांबा मुलांनो, तुह्मांला कांहीं समजत नाहीं, अहो अडून गोळ्या मारणारे वीरजनहो, तर काय ही पृथ्वी निःक्षत्रिया झाली? म्हणून तुह्मी असें उद्धत भाषण करितां?

( पडद्या पलीकडे शब्द होतो. )

अरे आमच्या महाराजा पुढें क्षत्रिय ह्मणजे पदार्थ काय? आणि तसे क्षत्रिय आहेत कुठें?

---

१ अश्वरूप. २ वीराची आख्या. ३ रामचंद्राची .

लव—मूर्खहो, तुह्मांस धिक्कार असो. क्षत्रिय नाहींत ह्मणतां काय? पण तुह्मांस ठाऊक असूं द्या.

### श्लोक.

जरि आहेत आहेत कां आह्मां भयदावितां ॥
बोलून काय तुमची पताका हरितों अतां ॥ ४० ॥

( मुलांस ह्म० ) गड्यांनो, पाहतां काय? या अश्वाला घेरा आणि ढेंकळांचा मार देऊन याला तिकडे घेऊन चला. हें भिकार तट्टू याला आश्रमांतील हरणां मध्यें चरूं द्या. ( एक क्रोधाविष्ट पुरुष गर्वानें पुढें येऊन ह्मणतो. ) अरे तुझ्या पोरपणास धिक्कार असो. काय हें भलतेंच बोललास. हे शस्त्रधारी वीर सामान्य नव्हत. मोठे कठीण आणि निर्दय आहेत. पोरांचें देखील असलें अमर्याद भाषण ते सोसणार नाहींत. आमचा राजा चंद्रकेतु हातांत धनुष्यबाण घेऊन ऋषींचें रमणीय आश्रमस्थान पहावयास दूर गेला आहे. तो जोंपर्यंत परत आला नाहीं तोंपर्यंत तुह्मी आपला जीव घेऊन झाडींतून लवकर पळून जा. तो आला ह्मणजे तुह्मांस फार कठीण जाईल.

मुलें—कुमारा लवा, चल, आपणाला अश्व कशास पाहिजे. हे वीर शस्त्रें चमकावून तुला दटावतात. आणि आश्रमही दूर राहिला. यासाठीं आपण हरणा सारख्या उड्या मारित पळून जाऊं.

### पद

चलजाउं अपुल्या घरा ॥ कुमारा चलजाउं अपुल्या ॥ ध्रु० ॥
कशास आह्मां अश्व पाहिजे ॥ ह्मणसी यातें धरा ॥ कु० ॥१॥
दाणा पाणी आणि खरारा ॥ कोण करिल तोबरा ॥ कु० ॥२॥

गुरुजी आह्मां रागें भरतील ॥ विचार नाहीं बरा ॥ कु० ॥३ ॥
आश्रमपदही दूर राहिलें ॥ अतां करावी त्वरा ॥ कुमा० ॥४ ॥
लव—काय ह्मणतां मुलांनो, ते शस्त्रें चमकावून आह्मांस दख-
वितात काय ? ( धनुष्य सज्ज करितो. )

श्लोक.

ज्या[1] हीच जिव्हा घन कोटि[2] दाढा ॥
टंकार[3] हा घर्घर शब्द गाढा ॥
ग्रासावया उद्यत[5] काळवक्र[6] ॥
तसें असो हें मम चापयंत्र ॥ ४१ ॥

( असें झाल्या वर सर्व निघून जातात. )

कौसल्याजनकदर्शननामक
चवथा अंक. समाप्त.

---

१ धनुष्याचीदोरी. २ धनुष्याचीं शेवटें. ३ धनुष्याचा टणत्कार. ४ भयंकर. ५ प्रवृत्त. ६ कालाचेंमुख.

# उत्तररामचरित्र नाटक.

## अंक ५.

### स्थल.

तपोवन.

### पात्रें.

चंद्रकेतु ........................लक्ष्मणाचा पुत्र.
सुमंत्र........................त्याचा सारथी.
लव ........................सीतेचा पुत्र.

( पडद्या पलिकडे शब्द होतो. ) अहो सैनिकहो, भिऊं नका, आतां आपणांस पाठबळ झालें.

### श्लोक.

सुमंत्र पिटितो जया जवन अश्व ज्या जोडले ॥
पथीं थडक लागतां ध्वज विशाळ ज्याचा हले ॥
रथीं बसुनियां अशा त्वरित चंद्रकेतूच हा ॥
रणीं निधन[1] आमुचें परिसतांचि आला पहा ॥ १ ॥

( इतक्यांत ज्या वर सुमंत्रनामा सारथी अशा रथावर बसून हातांत धनुष्यबाण घेऊन, आश्चर्य हर्ष आणि संभ्रम[2] यांनीं युक्त असा चंद्रकेतु येतो. )

**चंद्रकेतु**—आर्या सुमंत्रा, तिकडे पहा.

---

१ मरण. २ घाबरलेपणा.

श्लोक.

कोपें कसा होउनि रक्तदृष्टी ॥
सेने वरी हा करि बाणवृष्टी ॥
रणीं पहा लोलशिखंड नीट ॥
कोणी असे क्षत्रियबाळ धीट ॥ २ ॥

आणखो हें मोठें आश्चर्य दिसतें पहा.

श्लोक.

एकाकी मुनिबाळ सैनिक बहू त्यांनीं पहा वेढिला ॥
कोणी हा रघुवंशसंभव नवा अंकूर वाटे मला ॥
सोडी बाण सहस्रशा झटझटां फोडी करीमस्तका ॥
शस्त्रांची अतिघोर वृष्टि करितो देतो अह्मां कौतुका ॥ ३ ॥

सुमंत्र--हे आयुष्मंता चंद्रकेतो, ऐकतोस ?

श्लोक.

देवासुरांहुनि पराक्रम थोर याचा ॥
त्वत्तुल्यरूप दिसतोच तुझ्या वयाचा ॥
पाहूनि कौशिकमखद्विषमंथनातें ॥
घेतो धनुष्य रघुनंदनये मनातें ॥ ४ ॥

चंद्रकेतु—एकट्या मुलां वर बहुत सैनिक उठले हें पाहून मला लाज वाटत्ये.

श्लोक.

शिशू एकटा त्या वरी सर्व सेना ॥
निघाली उठे धूळ कांहीं दिसेना ॥

---

१ चंचलड्याचीं झुलें. २ विश्वामित्राच्या यज्ञाचा द्वेष करणारे राक्षस त्याच्या नाशाकरतां. ३ धनुष्य घेणारा रामचंद्रसा. ४ मनात येतो.

कराया तिणें घोर शस्त्रास्त्रवृष्टी ॥
तया वेढिलें पाहवेना स्वदृष्टी ॥ ५ ॥

सुमंत्र—वत्सा चंद्रकेतो, हे सर्व मिळून जरीं त्या वर गेले तरीं कांहीं व्हावयाचें नाहीं. मग एकेकटे फुटून गेल्यानें काय होणार आहे ?

चंद्रकेतु—आर्या सुमंत्रा, आतां त्वरा केली पाहिजे, पहा याणें आमच्या सैन्याचा संहार मांडला आहे. तेच पहा.

## श्लोक.

ज्याघोषें करितो गुहांत निजल्या हत्तीस कर्णव्यथा ॥
लोपे अंबुदगर्जना[1] मग किती या दुंदुभीची कथा ॥
त्या वीरें बहुवीर रुंडनिकरें[2] आच्छादिलें भूतळा ॥
वाटे होउनितृप्त हे उगळलें[3] काळें गिळीनागळा[4] ॥ ६ ॥

सुमंत्र—( मनांत ह्मणतो. अशा वीरा बरोबर द्वंद्वयुद्ध करण्यास चंद्रकेतूला मीं कसें अनुमोदन द्यावें ? ( पुनः विचार करून ) अथवा इक्ष्वाकु वंशीय राजांच्या पदरचीं आह्मीं वृद्ध माणसें पडलों, यास्तव कांहीं तरीं उपाय योजला पाहिजे. तर सांप्रत काय योजना करावी ?

चंद्रकेतु—( विस्मय लज्जा आणि संभ्रम यांनीं युक्त होऊन, ) छी छी, हें काय झालें ! माझीं सर्व सैन्यें माघारीं परतलीं!

सुमंत्र—( रथ धांवडून, ) वत्सा चंद्रकेतो, हा वीर समक्ष बोलावया जोगा तुला जवळ केला. आतां याशीं कांहीं बोलावयाचें असल्यास बोलावें.

चंद्रकेतु—( विसरलासें करून. ) आर्या सुमंत्रा, हाक मारणा-

---

१ मेघ गर्जना. २ मस्तकसमूहें. ३ ओकून टाकले. ४ पोट भरल्यामळें.

रांनीं याचें नांव काय घेतलें होतें बरें, तुला स्मरण आहे ?

सुमंत्र—होय मला स्मरण आहे. वत्सा याचें नांव लव असें घेतलें होतें.

चंद्रकेतु—( लवा कडे पाहून. ) हे महाबाहो लवा, या सैनिकांशीं तुला काय करावयाचें आहे ? हा मी एथें आहें, मजकडे ये. अरे, तेजानें तेजांतच शांत व्हावें हें योग्य.

सुमंत्र—कुमारा चंद्रकेतो, पहा पहा बरें.

### श्लोक.

हा बालवीर पृतनामेथना त्यजून ॥
हाके तुझ्या परतला झणि आयकूनें ॥
मेघध्वनी परिसतांच गजावमर्दे ॥
सोडून जेंवि फिरतो हरिशाव मर्द ॥ ७ ॥

( इतक्यांत पराक्रमशाली लव त्वरेनें जवळ येतो. )

लव—शाबास राजपुत्रा शाबास, तूं इक्ष्वाकुवंशोद्भव खरा. त्वां मला हटकलें ह्मणून हा मी तुज कडे आलों पहा.

( तिकडे सैन्यांत मोठा गलबला होतो. )

लव—( त्वेषानें मागें पाहून. ) काय हे सैनिक नुकते भग्न झाले तरी फिरून येऊन सारे जमून युद्धाच्या इच्छेनें मजवर शरप्रहार करितात ! हे विचारमूढांनो, तुह्मांस धिक्कार असो. तुह्मी काय समजलां ?

### श्लोक.

तुह्मी जो हा केला चहुंकडुनि मोठा गलबला ॥
गिळो माझाक्रोधानल सहज त्या तुच्छ कवला ॥

---

१ सैन्याचा नाश. २ तुझ्या हाकेस ऐकून. ३ गजाचें मथन. ४ सिंहाचा बालक.

समुद्राचा ओघ मलयपवनानें खवळतो ॥
तरीं त्यातें सद्यः क्षुभितवडवाग्नीच गिळतो ॥ ८ ॥

( किंचित् खिन्न होऊन इकडे तिकडे फिरतो )

चंद्रकेतु—हे कुमारा लवा, तूं मजकडे पहा.

श्लोक.

त्वदीय गुण पाहतां गमसि सत्य माझा सखा ॥
मदीय जन तो तुझा सकलही न तूं पारखा ॥
निजा परिजना वरी निकर मांडिशी हा कसा ॥
मवीर तरि तूं खरा उतरशील माझ्या कसा ॥ ९ ॥

लव—( हर्षानें आणि संभ्रमानें मागें फिरून मनांत ह्मणतो. ) अहो हा सूर्यवंशोद्भव कुमार मोठा पराक्रमी आणि चतुर दिसतो. पहा याची वीरोक्ति मसन्न असून कर्कश अशी चमत्कारिक आहे. तस्मात् त्या सैनिकांशीं मला काय करावयाचें आहे. आपण याशींच गांठ घालावी,

( असे ह्मणून सैनिकां कडे वळतो. )

चंद्रकेतु—आर्या सुमंत्रा, पहा पहा, ही पाहण्या जोगी चमत्कारिक गोष्ट आहे.

श्लोक.

माझ्या वरी करि सकौतुक दर्पदृष्टी ॥
मागें बळांवरिहि हा धरि धन्वयष्टी ॥
दोंहीं कडे पवन हालवितो जयाला ॥
तो इंद्रचापधर मेघ ह्मणों तयाला ॥ १० ॥

सुमंत्र—याला अशा मकारें पाहण्यास तरीं तूंच समर्थ. मी तर केवळ आश्चर्यांत बुडून गेलों. मला दुसरें कांहीं दिसत नाहीं.

---

१ क्रोधदृष्टी. २ सैन्यांवर. ३ मनुष्य. ४ वायु.

चंद्रके०—अहो युद्ध करणारे राजे लोकांनो, ऐका.

श्लोक.

तो एकाकी अगणित तुह्मी वाहनीं [1]भूमिसंगीं ॥
अंगा मध्यें कवच तुमच्या [2]चर्म आहे तदंगीं ॥
तो हा बाल [3]वयस तुह्मी पाहतां त्या तशातें ॥
जिंकायाला [4]विषमसमरीं धिक् तुह्मांतें अह्मांतें ॥११॥

लव—( अवज्ञापूर्वक,) हा मज वर दया करितो काय ? (क्षणभर विचार करून ) असो आतां उगीच कालहरण कशास पाहिजे ? जृंभकास्त्राचा प्रयोग करून हें सर्व सैन्य निश्चेष्ट करून टाकतों पहा. ( असें ह्मणून त्या अस्त्राचें ध्यान करित बसतो. )

( अस्त्रप्रभावानें सैन्य स्तब्ध होतें ) .

सुमंत्र—( मनांत ) कायहो, एकाएकीं आमच्या सैन्यांतील गलबला अगदीं बंद झाला हें कसें ?

लव—आतां मी हा मौढी दाखविणारा राजकुमार पाहतों कसा आहे तो. ( डौलानें इकडे तिकडे फिरतो. )

सुमंत्र—( गडबडून, ) वत्सा चंद्रकेतो, मला वाटतें, या मुलानें जृंभकास्त्राचा प्रयोग केला. ह्मणूनच आपल्या सैन्याची अशी अवस्था झाली.

चंद्रके०—यांत काय संदेह तेंच खरें. पहा.

श्लोक.

होतां जशी मिसळ [5]वैद्युतें तामसाची ॥

---

१ भूमिभागीं. २ मृगचर्म. ३ वृद्ध. ४ समानयोध्यांचा नव्हे. आशारणांत. ५ विजेच्या प्रकाशाची आणि अंधकाराची मिसळ होतां जशी दृष्टि बद्ध मुक्त होते तशी झाली.

झाली तशी ग्रसित मुक्तहि दृष्टि साची ॥
निश्चेष्ट हें लिखिततुल्य चि सैन्य सारें ॥
केलें पहा अमित जृंभकवीर्यसारें ॥ १२ ॥

आणखी आश्चर्य पहा.

श्लोक.

पातालस्थघनांधकारसदृशें हीं जृंभकें श्यामलें ॥
आकाशीं भरलीं तयांत कपिलें तेजें पहा उज्वलें ॥
कल्पांतीं सुकठोरमारुतमहाघातेंचि जीं तोडलीं ॥
जाणो मेघतडित्सहायशिखरें विंध्याद्रिचीं चाललीं ॥ १३ ॥

सुमंत्र—याला जृंभकास्त्राची प्राप्ति कोठून असावी बरें ?

चंद्रक०—त्या वाल्मीकिऋषीपासून असावी असें मला वाटतें

सुमंत्र—हे ऋषी अस्त्रा विषयीं खटपट करीत नाहींत. त्यांत विशेषेंकरुन जृंभकास्त्राविषयीं तर नाहींतच. कांकीं,

आर्या.

झालीं कृशाश्वमुनिला त्यापासुनि कौशिका कडे गेलीं ॥
त्याच्याच संप्रदायें श्रीरघुनाथा कडेस तीं आलीं ॥ १४ ॥

चंद्रकेत—कोणीअसे ह्मणतात कीं ज्यांच्या मध्यें सत्वगुणाचा विशेष आविर्भाव असतो असे जेकोणी मंत्रद्रष्टे त्यांस स्वतःसिद्ध हीं उपलब्ध होतात.

सुमंत्र—( डोळ्यांत अश्रु आणून, ) वत्साचंद्रकेतो, तो वीर माघारा इकडे परतला पहा, सावध ऐस.

( चंद्रकेतु आणि लव हे दोघे दुरून एकमेकांस उद्देशून मनांत ह्मणतात. ) या कुमारा कडे पाहून किती तरी आनंद होतो हा? (स्नेहानें आणि प्रीतीनें एकमेकां कडे निरखून पाहतात.)

---

१ जृंभकास्त्राच्या प्रभावानें. २ पिंगट तेजें. ३ मेघ विद्युल्लतासहित.

## दिंड्या.

सहजगत्या संवाद काय झाला ॥
कीं गुणांचा अतिशयचि फळा आला ॥ १५ ॥
अन्य जन्मीं संबंध निबिड होता ॥
या मुळें हा परिचयचि सुदृढ आतां ॥ १६ ॥
जन्मकाळीं चा गूण कीं उदेला
दैवयोगें अवचीत योग झाला ॥ १७ ॥
त्हदय माझें पाहून कुमारासी ॥
सावधानें लागतें तया पाशीं ॥ १८ ॥

सुमंत्र—बहुतकरून प्राण्यांचा धर्मच असा आहे, कीं कोणाची कोणावर तरीं विशेष प्रीति जडावी. याविषयीं लोकांत परस्पर ऋणानुबंध किंवा गणमैत्री अथवा चक्षुराग असें ह्मणतात. यालाच अबाधित आणि अहेतुक प्रेमा ह्मणावें.

## आर्या.

जो पक्षपात झाला निष्कारण त्यासकोण हो मोडी ॥
कीं स्नेहतंतु अंतःकरणातें दृढ शिवोनि यां जोडी ॥ १९ ॥

दोघे कुमार—(एकमेकास लक्षून ह्मणतात. (

## श्लोक.

पोटांवा परि जें मृदू सुभग ही ऐशा शरीरा वरी ॥
टाकावे शर तीक्ष्ण केंवि उपजे शंका मदभ्यंतरीं ॥
भेटावे मिळतां जया लवकरी ऐसें मनीं येतसे ॥
या साठीं सहसा मदीय तनु हो रोमांचिता होतसे ॥ २० ॥

( किंचित् विचार करून, )

---

१ अंतः करणाची आसक्ति. २ रेशमी वस्त्रासारखें मऊ. ३ सुंदर.

### श्लोक.

कीं तेजस्वि वरानरावरं गती शस्त्राविणें कोणती ॥
तीं शस्त्रें तरि काय होत न अशा लक्ष्यासें जीं पावती ॥
मातें हाच ह्मणेल काय फिरतां घेऊन शस्त्रें करीं ॥
वीरांचा परिपाठ दारुण असा लेहास बाधा करी ॥ २१ ॥

**सुमंत्र**—( लवा कडे निरखून पाहून, हा सीतापुत्र असेल काय असें समजून डोळ्यांस पाणी आणून मनांत ह्मणतो. ) वेड्या ह्दया, कशालाही भलतीच कल्पना करतेंस !

### आर्या.

बीजेंचि मनोरथाचें नेलें दैवें हिरून दाटून ॥
होतां विच्छिन्न लता पुष्पफळाशा उरेल कोटून ॥ २२॥

**चंद्रकेतु**— आर्या सुमंत्रा, मला वाटतें रथांतून खालीं उतरावें.

**सुमंत्र**—कशा करतां ?

**चंद्रकेतु**—येणेंकरून त्या वीर पुरुषाचा सन्मान केलासें होईल आणि क्षात्रधर्माचेंही पालन केलेंसें होईल. कां कीं, रथीनें पादचाऱ्याशीं युद्ध करूं नये अशी शास्त्रवेत्त्यांची आज्ञा आहे.

**सुमंत्र**— ( मनांत. ) मला दोहोंकडून कसें संकट आलें पहा !

### आर्या.

जें कर्म न्यायागत त्यांतें आपण कसें निषेधावें ॥
किंवा अनुमोदन तरि साहसकर्मास मीं कसें द्यावें ॥ २३ ॥

**चंद्रकेतु०**— तुह्मी दशरथ महाराजांचे प्रिय मित्र ह्मणून, आ-

---

१ तेजस्वी पुरुषावर जाणें तर शस्त्रा वांचून गति नाहीं. २ निशाणास.
३ सीतारूप.

मच्या वडिलांस धर्मार्थाविषयीं कांहीं संशय वाटतो तेव्हां ते तुह्मांसच विचारतात, आणि तुह्मीच त्यांची संशयनिवृत्ति करतां, असें असतां या समयींच तुह्मांस इतका विचार कां पडला ?

सुमंत्र— हे चंद्रकेतो, तूं धर्मन्याय गोष्ट बोलतोस.

श्लोक.

संग्रामांतील हा न्याय हाच धर्म सनातन ॥
रघुवंशीय वीरांची वीरचर्या अशीच ही ॥ २४ ॥

चंद्रकेतु—हें तुमचें भाषण मतिरूप दिसतें. कारण कीं.

श्लोक.

इतिहासपुराणातें धर्म तत्वगतिप्रती ॥
तुह्मीच जाणतां वृद्ध रघूंची ही कुलस्थिती ॥ २५ ॥

सुमंत्र—( स्नेहाश्रु डोळ्यांत आणून चंद्रकेतुस आलिंगून ह्मणतो. )

श्लोक.

सुरपतिरिपुहंता जो तया त्वत्पित्याचें ॥
वय तरि किति सांगूं पाहतां अल्प त्याचें ॥
समरचरित गोष्टी मूल त्याचें करीतें ॥
दशरथकुलदैवें पावलें सुस्थितीतें ॥ २६ ॥

चंद्रकेतु— ( कष्टी होऊन, ह्मणतो. )

आर्या.

नाहीं संतति रामा मग आह्मां असुन काय इतरांतें ॥
हें दुःख सदा वाटे अमुच्या दुसऱ्या तिघांहि पितरांतें ॥ २७ ॥

---

१ इंद्रजिताचा हंता लक्ष्मण. २ भरतादिकांनें.

सुमंत्र—हरहर, हीं त्हृदयभेद करणारीं चंद्रकेतूचीं भाषणें आहेत.

लव—आतां काय करावें ? अंतःकरणाचे भाव मिश्रित झाले.

### श्लोक.

इंदू[1]दयीं कुमु[2]दिनी जशि हर्ष पावे ॥
पाहून यास मम दृष्टि तशी सुखावे ॥
बाहू पुन्हा फुरफुरे कँ[3]लहा कराया ॥
धाईच फार करितो धनुतें धराया ॥ २८ ॥

चंद्रकेतु—( रथा वरून खालीं उतरलेंसें करून. ) आर्या सुमंत्रा, हा मी सूर्यवंशोद्भव चंद्रकेतु तुला वंदन करितों.

सुमंत्र—आशीर्वाद देतो.

### आर्या.

[4]काकुत्स्था परि तुमचा अरि वरि घालू प्रताप पल्याण ॥
देवो सदा तुह्मांतें शाश्वत वाँ[5]राहदेवकल्याण ॥ २९ ॥

आणखी.

### श्लोक.

देऊ तो सविता तुला जय रणीं जो त्वत्कुळाचा पिता ॥
आनंदास वसिष्ठही कुलगुरू जो धर्मसंगोपिता ॥
इंद्राग्न्यादिकदेवताहि अपुलीं देऊत तेजें तुला ॥
आँ[6]शीदेतिल रामलक्ष्मण निजानंदाचिया हेतुला ॥ ३० ॥

लव—हे राजकुमारा, पुरे पुरे, अतिआदर कशास पाहिजे, रथावर होतास तोच बरा दिसत होतास.

चंद्रकेतु—तर मग त्वांही दुसऱ्या रथावर बसावें.

---

१ चंद्रोदयीं. २ कमलिनी. ३ युद्धकराया. ४ काकुत्स्थ राजा प्रमाणें तुमचा प्रताप शत्रू वर आसन घालो. ५ वराहावतारी विष्णु. ६ आशीर्वाद.

लव—आर्या, राजपुत्राला पुन्हा रथा वर बशीव.

सुमंत्र—आमचा चंद्रकेतु ह्मणतो तें त्वांही मान्य करावें.

लव—आपल्या वस्तू आनण स्वीकारण्या विषयीं विचार कशाचा ? परंतु आह्मी सदा अरण्यांत राहणारे. रथावर बसण्याच्या कामांत केवळ अनभ्यस्त आहों. हें तुह्मांसच योग्य.

चंद्रके॰—मुला, क्रूरपणा आणि सुजनपणा या दोहोंची क्रिया तूं बरीच जाणतोस ! अशा तुला इक्ष्वाकुवंशोद्भव राजा रामचंद्र जर पाहता तर त्याचें त्दृदय स्नेहानें पाझरलें असतें.

लव—मला ही असेंच वाटतें. तो राजर्षि फार सुजन आहे असें ऐकतों. ( लज्जित झाल्या सारखें करून, )

श्लोक.

आह्मी तरीं न करुं मत्सर त्या मखातें ॥
राजा गुणी न बहुमानिल कोण त्यातें ॥
क्षत्रास धिग्वचन जें हयरक्षकांचें ॥
तें लागलें स्वत्दृदया शलतुल्य साचें ॥ ३१ ॥

चंद्रके—( विस्मय करून, ) ताताचा प्रतापोत्कर्षही तुला सोसला नाहीं काय ?

लव—सोसला कीं न सोसला तें असो. पण मी तुला इतकेंच विचारितों. तो राजा फार शांत आणि नीतिमान् आहे असें ऐकतों. तस्मात् तो स्वतां कधीं असा गर्विष्ठ व्हाव याचा नाहीं, आणि त्याच्या प्रजाही तशा नसाव्या. मग त्याच्या पदरच्या मनुष्यांच्या मुखांतून अशी राक्षसी वाणी कशी निघाली बरें ?

## आर्या.

उन्मत्तगर्वितांच्या वाणीतें राक्षसी असें ह्मणती ॥
ती कारण वैराला निरयालाही असें मुनी गणती ॥ ३२ ॥

याप्रकारें राक्षसी वाणीची जे निंदा करितात तेच चांगल्या वाणीची स्तुति करितात. ती अशी.

## श्लोक.

प्रसवति बहुकामा घालवी दुर्दशेशी ॥
उपजवुनि सुकीर्ति दुष्कृतातें विनाशी ॥
सतत सदय माता मंगलाचीच मानू ॥
सुकवि वदति वाचा सूनृता कामधेनू ॥ ३३ ॥

**सुमंत्र**—( मनांत. ) या कुमाराचा स्वभाव परमशुद्ध दिसतो. कसा झाला तरी वाल्मीकिऋषीचा शिष्य आहे. ऋषीच्या सहवासानें याच्या मुखांतून भाषण किती प्रौढ निघतें हें!

**लव**—हे चंद्रकेतो, आपण मघां काय बोलला कीं ताताचा प्रतापोत्कर्ष तुला सोसला नाहीं काय ह्मणून, तर मी असें विचारितों. क्षत्रियधर्म कोणांस वांटला आहे काय?

**सुमंत्र**—इक्ष्वाकुकुलोद्भव जो राजा रामचंद्र त्याला तूं जाणत नाहींस ह्मणून असें बोलतोस. असो भाषणाचा अतिप्रसंग होईल पुरे कर आतां.

## श्लोक.

सैनिकांच्या प्रमथनीं पराक्रम तुझा असो ॥
जामदग्न्यास जो जिंकी त्याला बोल तुझा नसो ॥ ३४ ॥

**लव**—हे श्रेष्ठा, जामदग्न्यास जिंकणारा तो राजा, असें जें आपण बोललां, यांत मोठा पराक्रम तो काय सुचविला!

श्लोक.

वाणी मध्यें वीर्य आहे द्विजांचें ॥
बाहूं मध्यें राहतें क्षत्रियांचें ॥
घेतां शस्त्रा जिंकिलें ब्राह्मणातें ॥
झालें कर्म स्तुत्य हें का नृपातें ॥ ३५ ॥

चंद्रके०—(अवज्ञा दाखवून, ) आर्या सुमंत्रा, कशाला बोलतां याशीं ? पुनः पुन्हा उत्तरास प्रत्युत्तर, हें कशास पाहिजे, पुरे आतां.

श्लोक.

हा कोण संप्रति नवा पुरुषावतार ॥
वाटे जया न बहु भार्गवराम वीर ॥
केली सुखी अभय देउनि सप्तलोक. ॥
जेणें तदीय चरितें हि न जो विलोकी ॥ ३६ ॥

लव—त्या रघुपतीचें चरित्र आणि त्याचा महिमा जाणत नाहीं असा कोण आहे ? सर्वांस विदित आहेच. परंतु मला त्या विषयीं थोडें बोलावयाचें आहे. अथवा कशाला. असो तें.

श्लोक.

वृद्धांचीं चरितें असोत कशिही तेथेंच साधू रते ॥
केला स्त्रीवध जाहलें यश महालोकीं खरे थोर ते ॥
मागें तीन पदें दिलीं खररणीं आश्चर्य वाटे मना ॥
केलें कौशल वालिच्याहि निधनीं तें ठावकें या जना॥३७॥

चंद्रके०—वाव्हारे मुला, अमर्यादपणें गुरुजनास दोष लावून आपली बढाइकी दाखवितोस काय ?

---

१ ताटिकावध. २ खरासुराशीं युद्ध करतांना तीन पावलें मागें सरले. ३ कपट.

लव—अरे हा मज वरच डोळे वटारून भोंवया वर चढवितो!

सुमंत्र—आतां हे दोघेही क्रोधास चढले ! पहा,

श्लोक.—

चूडाबंधन मोकळें करितसे क्रोधा मुळें कंप हा ॥
झालीं रक्तसरोजपत्रसदृशें नेत्रें कशीं हीं पहा ॥
यांच्या फारचि नाचतात भुवया वक्रा वरी दीसते ॥
चंद्रीं लांछन पंक्ति कीं सुकमळीं भृंगावळी भासते ॥ ३८ ॥

चंद्रकेतु आणि लव—(एकमेकांस ह्मणतात.)
तर मग संग्रामास योग्य अशा मोकळ्या जाग्या वर चला जाऊं.

( असें बोलून मग निघोन जातात. )

कुमारविक्रमनामक पंचम अंक समाप्त.



# उत्तररामचरित्र नाटक.

## अंक ६.

स्थल.

संग्रामभूमि.

### पात्रें.

विद्याधर ..................विमानचारी देवविशेष.

विद्याधरी..................त्याची स्त्री.

रामचंद्र ..................अयोध्याधीश.

चंद्रकेतु ..................लक्ष्मणाचा पुत्र.

लव. ..................सीतेचा धाकटा पुत्र.

कुश...................त्याचा वडील भाऊ.

( तदनंतर एक विद्याधर,आणि त्याची स्त्री विद्याधरी उभयतां विमानांत बसून येतात. )

विद्याधर.–अहो केवढें आश्चर्य हें! हे दोघे सूर्यवंशोत्पन्न राजकुमार समय नसतां परस्पर कलहास प्रवृत्त झाले आहेत. यांचीं विक्रमचरित्रें पहा, कशीं क्षात्रतेजानें परिपूर्ण आणि देवा सुरांस ही आश्चर्य व भय देणारीं आहेत ! हे प्रिये तेंच पहा पहा.

श्लोक.

झणझणा धनुर्किंकिणि वाजती ॥
खणखणा गुणकोटि हि गाजती ॥
सणसणा सुटती शरं हे कसे ॥
समरलोक भयंकर हो तसे ॥ १ ॥

## आर्या.

आरंभींच निघालीं दिव्यास्त्रें मंगलार्थ दोघांचीं ॥
ध्वनि उठती दुंदुभिचे वाटति हीं गर्जितेंच मेघांचीं ॥ २ ॥

तर या दोघांही वीरां वर नवीन फुललेल्या सुवर्णमय कमल-पुष्पांची दाट वृष्टी करावी.

**विद्याधरी**—तर हें आकाश पुनः प्रलयकालीं वेगानें स्फुरण पावणाऱ्या विद्युल्लतेच्या तेजानें पिंगटवर्ण झाल्या सारखें एकाएकीं कशानें झालें बरें ?

**विद्याधर**—खरेंच. आज काय हें विलक्षण दिसतें ?

## आर्या.

जो त्वाष्ट्रयंत्रघर्षित[1] रवि त्याचें तेज ज्या पुढें नेसरे ॥
तो प्रलयरुद्रनयनस्थितवन्हिज्वाल काय हा पसरे ॥ ३ ॥

( अंमळ विचार करून, ) हां, समजलें, त्या वत्सा चंद्रके-तूनें आग्नेयास्त्राचा प्रयोग केला आहे. त्यांतील अग्नी-च्या ज्वालांचा हा संताप पसरला आहे. या समयीं क-शी अवस्था झाली आहे पहा.

## आर्या.

ज्यांचे ज्यांचे ध्वजपट चामर शस्त्राग्नि लागतां जळती ॥
ते ते विमानसंघ व्योमीं सहसा पहा कसे पळती ॥ ४ ॥
ज्या ध्वजपटांचला वर वन्हि शिखा जाउनी झगटतात ॥
ते स्वल्पकाल कुंकुमलेपें आरक्तसेच दिसतात ॥ ५ ॥

आणखी केवढें आश्चर्य हें ! ज्याच्या ठिणग्या वज्रखंडाचाही स्फोट करणाऱ्या, आणि ज्याच्या ज्वाला दशदिशांस चाट-णाऱ्या अतएव अतिभयंकर असा हा भगवान् हुताशन

---

१ विश्वकर्म्यानें चक्रा वर घासलेला. २ नदिके.

वाढत चालला; आणि ह्याचा प्रचंड संतापही चोहों कडे पसरत चालला आहे. तर आतां या प्रियेला आपल्या अंगानें झांकून घेऊन आपण दूर निघोन जावें हें बरें. ( त्या प्रमाणें करितो. )

**विद्याधरी**—वाहवा, बरें झालें, हा निर्मल मुक्ताफला सारखा शीतल, स्निग्ध, आणि मृदु, असा प्राणनाथाच्या त्द्दया-चा स्पर्श मला झाला. तेणेंकरून माझा सर्व संताप दूर होऊन मला किती आनंद व किती सुख होत आहे तरीं; जणु सुखाची तंद्राच लागली असें वाटतें. शाबास प्राण नाथा, शाबास, फार चांगलें केलें.

**विद्याधर**—यांत मी अधिक तें काय केलें ? अथवा.

### आर्या.

कांहीं न करी प्रियजन तरि सौख्यें दुःख दूर करितों कीं ॥
तें त्यास धन विलक्षण जो ज्यास प्रिय असेल जन लोकीं॥६॥

**विद्याधरी**—काय हो एकाएकींच ज्यां मध्यें विद्युल्लता मिश्रि-त होऊन वारंवार स्फुरण पावत्ये, आणि जे मत्तमयूरकंठा सारखे नीलवर्ण अशा निबिड मेघांनीं सर्व आकाश भरून गेलें हें काय ?

**विद्याधर**—वाहवा, कुमार लवानें आग्नेयास्त्राच्या शांत्यर्थ वारुणास्त्राचा प्रयोग केला, त्याचाच हा प्रभाव ! पहा लागलेंच निबिड जलधारांच्या संपातांनीं पावकास्त्र शांत झालें.

**विद्याधरी.**—अहाहा, फार चांगले झालें. फार चांगलें झालें.

**विद्याधर.**—वाहवा, अहो कोणतेंही अति झालें ह्मणजे वाईट. पहा, प्रबल वायूच्या क्षोभानें गंभीरध्वनी करणाऱ्या मेघां-नीं सर्व आकाश गच्च भरून गेलें. तेणेंकरून गाढ

अंधकार पडला, वायुसंचारासही अवकाश राहिला नाहीं. यामुळें सर्व प्राणिजात कोंडल्या सारखें होऊन थरथर कांपत आहे. तर असें वाटतें कीं, हें एकदांच विश्वाचा ग्रास करणाऱ्या काळाच्या भयंकर मुखांतच पडलें काय? किंवा कल्पांतीं योगनिद्रासमयीं ज्याचीं सर्व द्वारें बंद झालीं, अशा नारायणाच्या उदरांतच सांपडलें काय? ( तिकडे पाहून, ) शाबास वत्सा चंद्रकेतो, शाबास, यथायोग्य समयीं त्वां वायव्यास्त्राचा प्रयोग केला. कांकीं,

श्लोक.

वायूनें सर्व मेघांचा झाला लय नभीं तसा ॥
संद्विद्येनें विवर्तांचा लय ब्रह्मीं घडे जसा ॥ ७ ॥

**विद्याधरी.**—हे प्राणनाथा, हा कोण बरें, वेगानें छडी फिरवित आणि मधुर वचनानें युद्धाचा प्रतिषेध करित दोघां कुमारांच्यामध्येंच यासमयीं आपलें विमान उतरित आहे?

**विद्याधर.**—( त्या कडे पाहून, ) हा रघुपति, शंबुकाचा वध करून माघारा आला. चमत्कार पहा.

श्लोक.

वाणी महापुरुषभाषित आदरून ॥
तद्गौरवा स्तव निजास्त्रहि आंवरून ॥
झाला प्रशांत लव नम्रहि चंद्रकेतु ॥
होवो नृपास सुतसंगम भद्रहेतु ॥ ८ ॥

( यानंतर उभयतां विद्याधर निघून जातात. )

॥ हा विष्कंभक झाला ॥

( तदनंतर राम, लव, आणि चंद्रकेतु हे येतात. )

---

१ तत्वज्ञानानें. २ मिथ्याभासांचा. ३ कल्याणास्पद.

राम०—( पुष्पक विमानांतून खालीं उतरून ह्मणतो. )

श्लोक.

दिनकरकुलचंद्रा चंद्रकेतो कुमारा ॥
दृढतर परिरंभा देई मातें उदारा ॥
तुहिनशकल शीतें कोमळें जीं त्वदंगें
मम ह्रदय निवो हें त्यांचिया पूर्ण संगें ॥ ९ ॥

चंद्रकेतु—( पुढें येऊन, ( आर्या, मी अभिवंदन करितों.

राम०—(उठून प्रेमाश्रु डोळ्यांत आणून त्यास आलिंगून ह्मणतो दिव्यास्त्रधारका कुमारा , खुशाल आहेस कीं ?

चंद्रकेतु—अत्यद्भुत पराक्रमी आणि प्रियदर्शन अशा या लवाच्या अभ्युदयानें मी खुशाल आहें. माझी एक विनंती आहे कीं, मज वर जी कृपादृष्टी वडिलांची आहे तिजहुनि ही अधिक कृपादृष्टीनें या महावीरा कडे वडिलांनीं अवलोकन करावें.

राम०—( लवा कडे पाहून), काय दैव हें! हा वत्साचा सोबती कल्याणाकांत दिसतो.

श्लोक.

पाळाया लोकसारे धनुधर भगवान् हा धनुर्वेद झाला ॥
रक्षाया ब्रह्मवृंदा मति धरुनि तनू क्षात्र कीं धर्म आला ॥
सामर्थ्याचा गमे हा समुदय अथवा हा गुणांचा विसांवा ॥
कीं हा कल्याणरूपें परिणतचि जगत्पुण्यराशी असावा ॥१०॥

लव—( मनांत ) अहो हा कोणी पुण्यवान् आणि प्रतापी असा महापुरुष आहे.

---

१ आलिंगना. २ बर्फाच्या तुकड्या सारखी शीतल.

श्लोक.

भक्ति प्रीति स्नेह शांति यांचा आश्रय हा महा ॥
वाटे उत्कृष्ट धर्माचा मूर्तिमंत प्रसाद हा ॥ ११ ॥

आणखी हें आश्चर्य पहा !

श्लोक.

विरोध शांति प्रिति शीघ्र घेतो ॥
धणी सुखाची रस हाचि देतो ॥
औधत्य तें सर्व विरोन गेलें ॥
नम्रत्व चित्तीं सहसा उदेलें ॥ १२ ॥

आर्या.

यातें पाहुनि परवश झालों मी लागलेंच अवधान ॥
सत्तीर्थाचें तसें थोरांचें हें विचित्र महिमान ॥ १३ ॥

राम०—दुःखाची विश्रांति आणि अंतःकरणांत स्नेहाची उत्पत्ति हीं एकदांच कोणत्या कारणानें होतात हें समजत नाहीं. अथवा स्नेहाला कारणाची अपेक्षा नाहीं.

श्लोक.

पदार्थांच्या योगाप्रति किमपि अभ्यंतरिं वसे ॥
निमित्त प्रीतीला उघड उपधी कारण नसे ॥
प्रकाशीं भानूच्या कमल उमले वासहि सुटे ॥
विधूच्या पाषाणा उदयिं विधुच्या पाझर फुटे ॥१४॥

लव—हे चंद्रकेतो, हे कोण आहेत ?

चंद्रकेतु हे प्रियमित्रा, हे आमचे वडील होत.

लव—तर मग धर्मसंबंधानें माझेही वडील होत. कारण कीं तूं मला प्रियमित्र असें ह्मटलें. पण मी विचारतों, तुह्मीं ज्यांस

---

१ संयोगास २ कारण. ३ कोहीं असतें. (?) ४ चंद्र कांतास

वडील ह्मणावें, असे रामायणकथेंत चार पुरुष आहेत त्यांतील हे कोण? तें सांग.

चंद्रकेतु—मित्रा, त्या चौघांत हे ज्येष्ठ होत.

लव—( संतोष पावून, ( हांहां रघुनाथ ज्याला ह्मणतात ते हे काय ? काय दैवानें सुदिन दाखविला आज ? ( नम्रतेनें, आणि कौतुकानें निरखून पाहून ह्मणतो. ) वाल्मीकिमुनीचा शिष्य मी लव आपणास अभिवंदन करितों.

राम०-( स्नेहभावानें, ( मुला आयुष्मान् हो. ये ये इकडे मजजवळ. ( प्रीतीनें त्यास आलिंगून ह्मणतो) वत्सा, पुरे पुरेबा इतका विनय कशाला पाहिजे? अनेकवार मला दृढ आलिंगनमात्र दे.

## आर्या.

स्पर्श तुझा लाजवितो विकसितसुकुमारकमलगर्भातें ॥
आनंद चंद्रचंदनसम शीतल फार देतसे मातें ॥ १५ ॥

लव—( मनांत ह्मणतो. ) आह्मा सारख्यांवर या थोरांचा निष्कारण स्नेह अशा प्रकारचा होतो. असें असतां म्यां मूर्खानें यांशीं व्यर्थ द्रोह केला. तस्मात् शस्त्राचाच गुण असा की शस्त्र हातीं धरिलें ह्मणजे विरोध उत्पन्न व्हावा. ( उघडपणें ) महाराज, या लवानें अज्ञानपणा मुळें जो अपराध केला त्याची क्षमा वडिलांनीं करावी.

राम०—वत्सानें कायरे बा अपराध केला?

चंद्रकेतु—मी सांगतों, अश्वरक्षकांनीं जो या पायांचा प्रताप वाणिला तो ऐकून इर्ष्येनें यानें दोन घटिका बराच पराक्रम दाखविला.

राम०—अरे बा, हें तर क्षत्रियास भषणच आहे.

## श्लोक.

न तेजस्वी साहे प्रकट परतेजोबलमदा ॥
जयाचा जो आहे प्रकृतिगुण लोपे नच कदा ॥
मयूखांनीं जेव्हां प्रखरतर चंडांशु तपतो ॥
रविग्रावा तेव्हां अनल समतेजांस वमतो ॥ १६ ॥

चंद्रकेतु—हे तात, क्रोध तरीं अशाच वीरास शोभतो खरा, परंतु या प्रिय वयस्यानें जृंभकास्त्राच्या प्रयोगेंकरून सर्व सैन्य निश्चेष्ट केलें आहे. हें काय बरें.

राम०—( त्या कडे पाहून, ) वत्सा लवा, आतां आपल्या अस्त्राचा उपसंहार कर. हे चंद्रकेतो, तूंही निश्चेष्ट झालेल्या सैन्याचा विस्मय दूर करण्या साठीं त्यांचें सांत्वन कर.

लव—आज्ञा वडिलांची, ( असें ह्मणून अस्त्राचा उपसंहार करितो. )

चंद्रकेतु—आज्ञें प्रमाणें करितों. ( असें ह्मणून निघून जातो.)

लव—अस्त्र शांत झालें महाराज.

राम०—वत्सा, सरहस्य जृंभकास्त्राचा प्रयोग आणि उपसंहार हीं दोन्हीं वेदानुष्ठानसाध्य आहेत. गुरुसांप्रदाया वांचून कोणास प्राप्त व्हावयाचीं नाहींत.

## ओंव्या.

पूर्वी ब्रह्मादिक अतिहर्षें ॥ ब्रह्महिताच्या उत्कर्षें ॥
तप करितां लोटलीं वर्षें ॥ सहस्रांचींसहस्र ॥ १७ ॥
अनंतकाळ तपाच्या अंतीं ॥ पुराणमुनी पाहती चित्तीं ॥
हींच देखिलीं शस्त्रमूर्ती ॥ तपोमय स्वतेजें ॥ १८ ॥

आतां ही अस्त्रविद्या प्रथम कृशाश्व मुनीला प्राप्त झाली. ती

---

१ जो तेजस्वी असतो तो शत्रूचें तेज बल गर्व यांस सोशित नाहीं. २ किरणांनीं. ३ सूर्य. ४ सूर्यकांत. ५ अग्नितुल्य. ६ ओकतो.

त्यानें सहस्रावधि वर्षें सेवा करणारा जो शिष्य विश्वामित्र यास सांगितली. त्या विश्वामित्रऋषीनें कृपा करून मला दिली. असा हा या विद्येचा पूर्वानुक्रम आहे. पण तुला कोणत्या संप्रदायानें प्राप्त झाली तें सांग.

लव—हीं अस्त्रें आह्मां दोघांला स्वतः सिद्ध प्राप्त झालीं आहेत.

राम०—( विचार करून, ) हा मोठ्या पुण्याच्या परिपाकाचा अनिर्वाच्य महिमा दिसतो; असो, पण दोघांला ह्मटलें हें कसें ?

लव—आह्मी दोघे जुळे भाऊ आहों.

राम०—तर मग तो दुसरा कोठें आहे ?

( इतक्यांत पडद्या पलीकडे कुशाचा शब्द होतो. ) भांडायना, भांडायना, वर्तमान खरें काय रे ?

श्लोक

नरेंद्रसैन्या सह त्या लवाचा ॥
संग्राम तूं बोलसि काय साचा ॥
अस्तासि जावो अधिराज शब्द ॥
अस्त्राग्निला वीझवु चाप अब्द ॥ १९ ॥

राम०—कोण हा असें बोलतो ? ( पाहून. )

श्लोक.

हा कोण इंद्रमणितुल्यसुनीलकांती ॥
देतो पहा सुवचनें ह्रदयास शांती ॥
गंभीर शब्द घनगर्जितसा करीतो ॥
माझ्या तनूस सहसा पुलकें भरीतो ॥ २० ॥

---

१सार्वभौमराजा हा शब्द नाहींसा होवो. २माझा चाप मेघ शत्रूच्या अस्त्राग्नीला शांत करो.

लव—हा माझा वडील भाऊ कुशनामा, भरताश्रमापासून परत आला.

राम॰—(कौतुकानें, ) वत्सा, त्या मुलाला इकडे बोलाव.

लव—होय बोलावितों. ( असें ह्मणून त्याज कडे जातो. )

( इतक्यांत कुशयेतो. )

कुश—( विस्मयानें व हर्षानें युक्त होत्साता, धैर्यानें धनुष्याची दोरी तटूकारून ह्मणतो. (

श्लोक.

देवेंद्रप्रमुखामरांस अभया देऊनि सांभाळिते ॥
संग्रामीं अपुल्या प्रताप शिखिनें शत्रूसही जाळिते ॥
जे झाले रविच्या कुळांत नृपती वैवस्वतापासुनी ॥
त्यांशीं युद्ध घडेल काय दुसरें धन्यत्व तें याहुनी ॥२१ ॥

( असें बोलून उद्धतपणें इकडे तिकडे फिरतो. )

राम॰—या क्षत्रिय बाळका मध्यें केवढा हा पौरुषाचा अतिशय!

श्लोक.

दृष्टीप्रहा कशि जगत्रय तुच्छ जीला ॥
गंभीर उद्धत गती लववी महीला ॥
अल्पा वयांत गिरिसा गुरुतेंस घेतो ॥
हा मूर्त वीर रस कीं रणदर्प येतो ॥ २२ ॥

लव—( कुशा जवळ जाऊन. ) आर्यांचा जय असो.

कुश— हे आयुष्मंता लवा, युद्धयुद्ध ह्मणून जी वार्ता ऐकिली तें काय रे ?

लव—हो, तसें कांहीं झालें होतें. पण दादा, आतां हा गर्विष्ठपणा टाकून येथें अमळ विनयानें वागलें पाहिजे.

कुश—कशा करितां बरें ?

लव—येथें राजा रघुपति आला आहे. तो आपणा वर फार प्रीति करितो, आणि तुमच्या भेटी साठीं फार उत्कंठित झाला आहे. त्याज कडे चलावें.

कुश—( कांहीं तर्क करून, ) जो रामायणकथेचा मुख्य पुरुष आणि ब्राह्मणांचा रक्षणकर्ता तोच का ?

लव—होहो, तोच.

कुश—ज्याच्या पुण्य दर्शनाची इच्छा सर्वांनीं करावी, असा तो महात्मा पुरुष आहे खरा. परंतु कोणत्या प्रकारानें आह्मीं त्या जवळ जावें हें कळत नाहीं.

लव—पित्या प्रमाणें त्याचा गौरव केला पाहिजे.

कुश—पित्या प्रमाणें कां बरें ?

लव—हा ऊर्मिलेचा पुत्र चंद्रकेतु फार सुजन आहे. हा मला प्रियमित्र मानून सख्यानें माझ्याशीं वर्तला. त्याच्या संबंधानें हा राजर्षि आपला धर्माचा पिताच होय.

कुश—एकून क्षत्रिया पुढें नम्र होण्याचा प्रसंग आज आला तर !

लव—हा सामान्य क्षत्रिय नव्हे, याचा आकार, सामर्थ्य, आणि गांभीर्य यांवरून पाहिलें असतां यामध्यें लोकोत्तर चरित्राचा अतिशय आहे असें दिसून येतें. या महापुरुषा कडे नीट पहा अगोदर.

कुश—( रामा कडे निरखून पाहतो.) होय तसाच आहे खरा.

## आर्या.

आकृति पावन दिसते आनंदाचीच काय हे खाणी ॥
योग्यस्थानीं रामा यण कविची हि प्रवर्तली वाणी ॥२३॥

( जवळ जाऊन, ) अहो तात, हा वाल्मीकिमुनीचा शिष्य कुश नामा पायांस वंदन करितो.

राम०—दीर्घायुष्य असो, मुला इकडे ये. इकडे ये.

आर्या.

अमृतघना स्निग्धांगा वत्सा लावूं नको अतां वेळ ॥
भेटावयास तुतें हा जन झाला असे उतावेळ ॥ २४ ॥
( कुशास आलिंगून मनांत ह्मणतो. ) हा मूल माझें अप-
त्यच आहे काय? अहाहा !

साक्या.

प्रतिअंगापासुनि हा स्नेहें, देहसारच निघाला ॥
चैतन्याचा रस हा जाणो, प्रकटुनि बाहिर आला ॥ २५ ॥
सांद्रानंदरसाचा निर्झर, येउनि त्ह्रदया जडला ॥
गात्रा श्लेषमिषें अमृताचा, ओघचि मज वर पडला ॥ २६ ॥

लव—हे ताता, सूर्याचे किरण फार तीव्र आहेत, यासाठीं मुहूर्त मात्र या वृक्षच्छायेंत आसनावर बसावें.

राम०—बरें आहे. तूं ह्मणतोस तसेंच कां होईना.

( मग सर्व छायेंत जाऊन बसतात. )

राम०—(आपल्या मनांत ह्मणतो. )

श्लोक.

आश्चर्य थोर गमतें विनयांत याच्या ॥
सभ्यप्रकारचि गतिस्थिति आसनच्या ॥
सांम्राज्यसूचक मला दिसतात भाव ॥
दोघांहि या कुशलवांस समस्वभाव ॥ २७ ॥

श्लोक.

वपु सुरुचिर योग्य स्थान लक्ष्मीविलासा ॥
सकल गुण कराया इच्छिती येथ वासा ॥

किरण विमलरत्ना वेष्टिती जेंवि त्याचे ॥
विकसितअरविंदा बिंदु किंवा रसाचे ॥ २८ ॥

बहुशा रघुवंशीय कुमारांची छाया या दोघां वर दिसत्ये.

श्लोक.

कपोतकंठा सम कांति जीची ॥
शोभा वृषस्कंध समा तनूची ॥
प्रसन्न सिंहा परि दृष्टि थोर ॥
मृदंग शब्दा सम शब्द घोर ॥ २९ ॥

( सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन करून ह्मणतो. ) केवळ मज सारखीच यांची आकृति आहे असें नाहीं. तर,

साक्या.

जनकसुतेसहि सर्वांशीं हि दिसताती अनुरूपें ॥
निपुणपणें जाणाया जोगीं दोघांचीं ही रूपें ॥ ३० ॥
पाहुनि यांतें वाटे पूर्वीं जें अस्तंगत झालें ॥
तें साक्षान्मुख मम प्रियेचें नेत्रा समोर आलें ॥ ३१ ॥

श्लोक.

दंतास मुक्ताफलतुल्य वर्ण ॥
ती ओष्ठमुद्राहि तसेच कर्ण ॥
रक्तत्व नेत्रीं जरि दीसताहे ॥
तथापि शोभागुण तोच आहे ॥ ३२ ॥

विचार करून पाहिलें असतां,जेथें जानकीचा त्याग केला तेंच हें वाल्मीकिमुनीचें तपोवन; या दोघां मुलांची आकृति आणि स्वरूप पहावें तर या प्रकारचें; आणि जृंभकास्त्रें यांस स्वतः प्रकाशमान झालीं. याविषयीं मनांत येतें कीं, मागें चित्रदर्शन प्रसंगीं हीं अस्त्रें तुझ्या संततीस उप-

लब्ध होतील असें जें मी सहज बोललों होतों, तेंही सत्यास आल्या सारखें दिसतें. गुरु संप्रदाया वांचून हीं पूर्वीं कोणास प्राप्त झालीं नाहींत. असें मला पुरतें विदित आहे. तीं यांस संप्रदाया वांचून प्राप्त झालीं. या सर्व खुणा मिळतात. परंतु खरें कशा वरून मानावें. अथवा, यांस पाहून माझ्या ह्रदयास जो सुखातिशय झाला त्या मुळें मला असा भ्रम होतो कीं काय न कळे. एरवीं, मला स्मरण आहे, कीं जानकीला दोन गर्भ असावे असा माझा बहुशा तर्क होता. ( डोळ्यांस पाणी आणून. )

श्लोक.

तिच्या माझ्या स्नेहा अतिपरिचयें खंड न कदा ॥
बसें मी एकांतीं प्रियसखिस कुर्वाञ्छित तदा ॥
करस्पर्शें गर्भ द्विविध मज आधीं समजला ॥
तिला तो मागोनी बहुत दिवसांनीं उमजला ॥ ३३ ॥

( मनांत ह्मणतो. ) यांस मी हें कोणत्या प्रकारानें तरी विचारूं ? ( असें ह्मणून रडूं लागतो. )

लव—महाराज, हें काय ? हें रुदन कशा साठीं ?

आर्या.

जें मूर्त जगन्मंगल तें आनन बाष्पवृष्टिनें भिजलें ॥
आच्छादिलें हिमानें कमळ तसें स्पष्ट भासतें थिजलें ॥३४॥

कुश—वत्सा लवा, हें काय विचारावें ? अरे.

श्लोक.

कसें सीतादेवी विण रघुवरीं दुःख न पडे ॥
प्रियानाशें सारें जग वन तसें केंवि न घडे ॥
तसा प्रेमा त्यांचा निरवधि वियोगाधिहि असा ॥
विचारीशी वेड्या अनधिगत रामायण तसा ॥ ३५ ॥

**राम०**—( मनांत ह्मणतो. ) आतां भाषण कुंठित झालें. प्रश्न करून उपयोग नाहीं. हे दग्धत्दया, स्नेहातिशया मुळें काय हा तुला अकस्मात् विकार झाला ? शोकदुःखानें मी ग्रस्त झालों असें पाहून हीं मुलें देखील मज वर दया करूं लागलीं ! असो या दुःखावस्थेचें आतां आच्छादन केलें पाहिजे. ( उघडपणें. ) मुलांनो, रामायण ह्मणून वाल्मीकिऋषीनें कांहीं चमत्कारिक ग्रंथ केला आहे, त्यांत रघुवंशीय पुरुषांचें चरित्र वर्णिलें आहे, ह्मणून ऐकतों, तर त्यांतील थोडेंसें तुह्मांपासून ऐकावें अशी माझी इच्छा आहे.

**कुश**—गुरुजींनीं सर्व रामायणकथा आह्मांस पढविली आहे खरी, परंतु त्यांतील बालकांडाच्या शेवटच्या अध्यायांतील दोन श्लोक आह्मांस आठवतात.

**राम०**—तेच ह्मणा ह्मणा बरें पाहूं.

**कुश**—( ते दोन श्लोक ह्मणतो. ) ५२

रामचंद्रा सती सीता प्रिय होती स्वभावतां ॥
तो प्रेमा स्वगुणांनींच तिणें वाढविला स्वतां ॥ ३६ ॥
तसाच राम सीतेला प्राणाहूनि असे प्रिय ॥
त्यांचेंच जाणे त्दय प्रीतियोग परस्पर ॥ ३७ ॥

**राम०**—हरहर, हें वचन त्दयभेद करणारें, परम दुःखास्पद आहे. हा देवी जानकी, त्या वेळीं तूं अशीच होतीस. अहो हे संसारवृत्तांत निष्कारण विपर्यास आणणारे, वृत्तीस विरस करणारे, आणि शेवटीं दुःख देणारे आहेत. यांनीं कोणास ताप दिला नाहीं ? यांस धिक्कार असो.

साकया.

कोठें तो आनंद आपला त्याकाळींचा गेला ॥
रात्रं दिव एकांतीं जो अतिविश्वासें वाढविला ॥ ३८ ॥

कोठें तेही प्रयत्न आपण परस्परें जे केले ॥
चित्तांतिल निर्भर कौतुकरस तेही कोठें गेले ॥ ३९ ॥
सुखांत वा दुःखांत ऐक्यही जें त्दृदयांचें होतें ॥
दुर्दैवानें सारें नेलें कोठें आहे होतें ॥ ४० ॥
प्रतिक्षणीं दुःखानें प्राण व्याकुळ होतो याचा ॥
तथापि नाहीं होत कसा हो विराम या पापाचा ॥४१॥

काय दुःख हें !

### आर्या.

शतशा गुण प्रियेचे ते पावति एकदांच उदयाला ॥
यास्तव अतिदुःस्मर जों दिधलें त्या आठवून समयाला ॥ ४२ ॥

त्या समयीं असें झालें होतें.

### दिंडया.

थोडेथोडें घेतलें स्थान ज्यांनीं ॥
पुढें विस्तारहि कितीका दिसोंनीं ॥
स्थिती ऐशी घेतली उरोजांनीं ॥
दिलें मदनाला स्थान तदा त्यांनीं ॥ ४३ ॥
प्रौढतेला वय जसें जसें आलें ॥
प्रेम चित्तीं तसतसें रूढ झालें ॥
प्रौढतेचा व्यापार मनीं वाहे ॥
परी देहीं ती क्रिया मुग्ध राहे ॥ ४४ ॥

**कुश**—मंदाकिनीच्या तीरीं चित्रकूट पर्वताच्या वनांत विहार करित असतां सीता देवीस उद्देशून रघुपती बोलला. तो हा-

### श्लोक.

" मांडिला गे तुझ्या साठीं शिलामंचक हा महा ॥
ज्याच्या सभोंवतीं पुष्पें वर्षला मोगरा पहा " ॥ ४५ ॥

---

१ प्रथम अंकुरित झाले. २ पुढें विस्तृत झाले. ३ स्तन.

राम०—( लज्जित होऊन करुणायुक्त स्नेहानें मनांत ह्मणतो ) हा मुलगा अगदीं वेडा आहे. हा अरण्यचर खरा. कोणत्या वेळेस काय बोलावें हें याला समजत नाहीं. हा देवी जानकी, त्या प्रदेशाचें आणि त्या सुखदायक प्रसंगाचें तुला स्मरण आहे काय ? हाय हाय, काय दुःखाची गोष्ट ही ! त्यावेळची तुझी चर्या मला स्मरत्ये.

श्लोक.

श्रमांबूवरी लागतां शीत वाटे ॥
असा मंद मंदाकिनीवात सुटे ॥
ललाटा वरी केश तो वात आणी ॥
नसे दूर सारावया शक्त पाणी ॥ ४६ ॥

श्लोक.

गेलें कुंकुम भाळिंचें न कळतां घर्मांबुनें ही जरी ॥
शोभे फार ललाट अंकरहिता त्या चंद्रखंडा परी ॥
भूषाहीनहि कर्ण रम्य सुरुची गाला वरी ज्यास तें ॥
गे माझ्या नयना पुढें मुख तुझें प्राणप्रिये दीसतें ॥ ४७ ॥
( क्षणभर स्तब्ध राहून करुणेनें ह्मणतो. )
अहो काय सांगावें!

साक्या.

ज्याचें ध्यान निरंतर मज तो प्रियजन पुढेंचि येतो ॥
समाधानविरहांतहि मातें प्रत्यक्षा परि देतो ॥ ४८ ॥
संकल्पाचा उपरम होतां जग हें अरण्य वाटे ॥
जाणों दीप्त हुताशीं माझें दग्ध त्दृदय हें फाटे ॥ ४९ ॥
( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो. )

१ घामावर. २ हस्त. ३ निष्कलंक चंद्र शकलासारखें..

## ओंव्या.

वसिष्ठ आणि वाल्मीकिमुनी ॥ दशरथाच्या स्त्रिया तीन्ही ॥
जनकराजा मिथिलेचा धनी ॥ अरुंधती सातवी ॥ ५० ॥
ऐकूनि शिशुकलहाची मात ॥ झाली चित्तीं भयाभीत ॥
जावया त्या ठाया त्वरित ॥ उठाउठीं निघालीं ॥ ५१ ॥
जेरेनें व्यापिलीं सर्व गात्रें ॥ हातीं घेऊनि वंशवेत्रें ॥
जाऊं इच्छिती क्षणमात्रें ॥ पहावया कौतुका ॥ ५२ ॥
परि नसरे चालतां वाट ॥ मुखीं वाहतसे श्वास दाट ॥
आंगीं धर्मांबूचे लोट ॥ मस्तकाहुनी चालती ॥ ५३ ॥
आश्रमापासूनियां फार ॥ संग्रामस्थान असे दूर ॥
श्रमानें जड झालें शरीर ॥ ह्मणून मंदमंद येतात ॥ ५४ ॥

राम०—काय हा भगवान् वसिष्ठ, ही अरुंधती, या माझ्या माता, हा वाल्मीकिमुनी. हे सारे एकदांच एथें आले काय? त्यांच्या पुढें म्यां जावें तरी कसें? (करुणायुक्त होऊन पाहतो.) हाय हाय, काय दैव हें माझें पहा. जनक राजाही यासमयीं एथें आला. याला पाहून तर वज्रपातच मजवर झाला असें मला वाटतें.

## साक्या.

संबंधाची आवड मोठी होती जनास भारी ॥
होतां तो संबंध पावली प्रजा सुखातें सारी ॥ ५५ ॥
स्वापत्यांचें विवाहकौतुक बहु ज्यांनीं अनुभविलें ॥
त्या तातांचें सुख काय वदूं स्वर्गसुखहि लाजविलें ॥ ५६ ॥
पहिल्यापासुनि सखा पित्याचा संबंधीही झाला ॥
तेथें केलें घोर कर्म म्यां कैसें पाहूं त्याला ॥ ५७ ॥

---

१ वृद्धत्वानें. २ वेळूच्या काठ्या.

या जनकाचें दर्शन न करें शतधा भेदिल मातें ॥
अथवा कांहीं दुष्कर नाहीं या निर्दय रामातें ॥ ५८ ॥
( पडद्यांतून शब्द होतो.)

श्लोक.

पाहूनि पांडु कुश दुःखित जांवयाला ॥
मोहाद्रिचाच जनका वरि पात झाला ॥
जों त्यास सावध करी इतक्यांत धाता ॥
होऊनियां विकल पावति मोह माता ॥ ५९ ॥

**राम०**—( तें पाहून मनांत ह्मणतो ) हे ताता वसिष्ठा, अहो मातांनो, हे मिथिलाधिपते जनका, मला पाप्याला पाहून तुमच्या ऱ्हदयांत इतकी करुणा कशाला उत्पन्न झाली?

आर्या.

जें जनकरघुकुलांचें मंगल कीं सुकृतवल्लिचें सुमचीं ॥
त्याची न ज्यास करुणा त्या वर करुणा वृथाचि हे तुमची॥१॥

असो, यांची भेट तर घेतली पाहिजे. (असें ह्मणून उठतो.)

**कुश आणि लव०**—( पुढें होऊन. ) अहो तात, असें इकडून चलावें आणि गुरुजन मंडळीस भेटावें.

( मग सर्व निघून जातात.)

कुमारप्रत्यभिज्ञाननामक साहवा अंक समाप्त.

---

१ देव. २ पुण्यलतेचें पुष्प.

# उत्तररामचरित्र नाटक.

## अंक ७.

स्थल.

गंगातीर.

पात्रें.

रामचंद्र............अयोध्याधीश.
लक्ष्मण............त्याचा भाऊ.
सूत्रधार ..........नाटककर्ता.
गंगा ............भागीरथी कुलदेवता.
पृथ्वी ............सीताजननी.
सीता ............रामपत्नी.
अरुंधती ..........वसिष्ठपत्नी.
वाल्मीकि ..........प्राचेतसमुनी.
कुश, लव ..........रामाचें पुत्र.

(तदनंतर प्रथम लक्ष्मण येतो.)

**लक्ष्मण**—वाहवा! अहो आज भगवान् वाल्मीकिऋषि यांहीं आमच्या नगरांतील आणि देशांतील ब्राह्मणक्षत्रियादि सर्व प्रजा आह्मां सुद्धां बोलावून आणिल्या, आणि आपल्या तपःसामर्थ्यानें देव, दैत्य, गंधर्व, ऋषि, पक्षिनायक, सर्पनायक, आदिकरून यच्चयावत् जंगमभूत समुदाय एथें जमविला आहे.—रामचंद्र प्रभूनें ही मला अशी आज्ञा केली आहे कीं, वत्सा लक्ष्मणा, वाल्मीकिऋषीनें स्वतां केलेल्या नाटकाचा खेळ अप्सरां कडून तो करविणार

आहे. तो खेळ पाहण्या करितां त्याणें आह्मां सर्वांस बोलाविलें आहे. यासाठीं गंगातीरीं नाट्यमंडपांत जाऊन सर्वांस यथायोग्य बसण्याच्या स्थळांची सिद्धता करावी ह्मणून. त्या प्रमाणें मीही देव मनुष्य आदिकरून सर्वांस यथायोग्य स्थानांची आणि यथायोग्य असनांची सिद्धता केली आहे. आतां प्रभूची स्वारी येण्याचा मात्र खोळंबा आहे. त्याचीच सर्व मार्ग प्रतीक्षा करित आहेत. ( वाटेकडे पाहून ) हांहां प्रभु रामचंद्र आला वाटतें. (निरखून,)

**श्लोक.**

भोगी जरी राज्यसुखा श्रमातें ॥
घेतो मुनींच्या नियमश्रमातें ॥
वाल्मीकि तें गौरव द्यावयाला ॥
श्रीराम तो हा इकडेस आला ॥ १ ॥

( इतक्यांत रामचंद्र येतो. )

**राम०**— वत्सा लक्ष्मणा, रंगसभेंत प्रेक्षक जन सर्व आपापल्या जागीं बसले काय ?

**लक्ष्मण**— होय, ते केव्हांच बसले. आपलीच प्रतीक्षा करित आहेत.

**राम०**— हे दोघे मुलगे कुश आणि लव बराबर आहेत यांस चंद्रकेतूच्या बरोबरीनें जागा करून दे हो.

**लक्ष्मण**— प्रभूची प्रीति त्यां वर पाहून मीं पूर्वींच तसें केलें आहे. महाराज, हें राजासन, यावर आपण बसावें.

( राम आसना वर बसतो. त्याच्या जवळ ते दोघे मुलगे आसना वर बसतात. )

**राम०**— अहो आतां चालूं द्या तुमचें नाटक

( सूत्रधार येतो. )

**सूत्रधार**—सत्यार्थ कथनकर्ता वाल्मीकिमुनी याची स्थावरजं-

गमात्मक सकळ विश्वास अशी आज्ञा आहे कीं, आह्मी ज्ञानदृष्टीनें पाहून जें पावन आणि करुणाद्भुत रसानें युक्त असें कांहीं काव्य केलें आहे, त्याज कडे कार्यगौरवास्तव सर्वांनीं अवधान द्यावें. ह्मणून मीही सर्वांस तीच प्रार्थना करितों.

**राम०**— (मनांत ह्मणतो.) एकुन यांत असें दिसतें. ज्यास धर्मसाक्षात्कार आणि परोक्षज्ञात, अशा ऋषींचीं वचनें अमृततुल्य आणि ज्ञानें शुद्ध सत्वात्मक असतात. तेव्हां त्यांची कृति कधीं अन्यथा होईल अशी शंका करणें नको. (पडद्यांत सीतेचा शब्द होतो.) हे प्राणनाथा, हे कुमारा लक्ष्मणा, काय मी मंदभाग्या ही? या घोर अरण्यांत एकटी पडलें. कोणी सहाय नाहीं, व कोणाची आशा ही जिला उरली नाहीं, त्यांत जिला प्रसूति समय जवळ आला, प्रसव वेदना जिला सोसत नाहीं अशीला पाहून श्वापदेंही भक्षावयास पाहत आहेत. अशा दुःख संकटांत मी पडलें आहें. ह्मणून मी आतां आपला देह या समयीं भागीरथीच्या प्रवाहांत टाकितें. क्षमा करावी.

**लक्ष्मण**—(आपल्या मनांत ह्मणतो.) हाय हाय, काय कष्ट हे. ही विपरीतच गोष्ट कानीं येत्ये

**सूत्रधार**— आर्या.

भूदेवीची कन्या जी रामें टाकिली अरण्यांत ॥
ती प्रसवाच्या दुःखें देहाला टाकिते प्रवाहांत ॥ २ ॥

(असें बोलून सूत्रधार निघून जातो.)

**राम०**—हे देवी जानकी, क्षणभर अवकाश कर.

**लक्ष्मण**— महाराज, हें नाटक चाललें आहे. खरें नव्हे.

**राम०**—हे देवी दंडकारण्यांत सुख देणारे प्राणसखे, या निर्दय रामाच्या मुळें दुर्दैवाचा घाला तुज वर पडला ना?

**लक्ष्मण**—महाराज, हें काय बोलतां ? या नाटकांत काय काय होतें तें पहा अगोदर.

**राम०**—वत्सा हा वज्र त्दय राम त्याही गोष्टीस सिद्धच आहे.

(इतक्यांत एकेक मूल मांडी वर घेतलेल्या पृथ्वी आणि गंगा या सीतेला घेऊन येतात. )

**राम०**—वत्सा लक्ष्मणा, असभावित आणि अमर्याद शोकांत मी पडलों असें वाटतें. तर आतां तूं मला संभाळ.

**भागीरथी**— श्लोक.

हो स्वस्थ जानकि नको करुं दुःख कांहीं ॥
कल्याणवृद्धि तुज हे पुढतींच पाहीं ॥
अंतर्जलीं प्रसवलीस सुतद्वयातें ॥
वंशप्रवर्तक असें ह्मणतील यातें ॥ ३ ॥

**सीता**—( सावध होऊन. ) मो दोन मुलें प्रसवलें काय ? फार चांगली गोष्ट. पण यासमयीं माझा प्राणनाथ कोठें आहे ? हा प्राणनाथा ?

( असें ह्मणून मूर्छा पावत्ये. )

**लक्ष्मण**—( रामाच्या पायां वर मस्तक ठेवून ह्मणतो,) हे आर्या रामा, आनंदाची गोष्ट आहे. रघुवंशाला कल्याणरूप अंकूर उद्भवला. ( रामाच्या मुखा कडे पाहून, ) हाय हाय, प्रभूच्या डोळ्यांतून तर अश्रूंचे लोट चालले आहेत. हा अगदीं मोहित झाला असें वाटतें.( पदरानें वारा घालितो.) आर्या सावध हो.

**गंगा व पृथ्वी**—वत्सें जानकी, सावध हो, सावध हो.

**सीता**—(सावध होऊन त्यांस ह्मणत्ये) बाई तुह्मो कोण दोघी ?

**पृथ्वी**—वत्से ही तुझ्या सासऱ्याची कुलदेवता भागीरथी.

**सीता**—देवी, तुला माझा नमस्कार असो.

गंगा—मुली पातिव्रत्यानें संपादित आणि लोकमान्य अशी कल्याण संपत्ति तुला प्राप्त होवो.

लक्ष्मण—हा आह्मां वर अनुग्रहच आहे.

गंगा—ही तुझी जननी वसुंधरा.

सीता—हा माते वसुंधरे, अशा अवस्थेंत तूं मला पाहत्येस ना?

पृथ्वी—अगे वत्से, अगे मुली, इकडे मज जवळ ये.

( सीतेला आलिंगून मूर्छा पावत्ये. )

लक्ष्मण —( हर्षानें. ) पृथ्वी आणि भागीरथी या दोघी जानकीला सहाय झाल्या, आता चिंता नाहीं.

राम०—( तिकडे पाहून, ) हरहर काय कष्ट हे. ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. सर्वसहेलाही[1] हें दुःख असह्य झालें. तस्मात् हा अपत्यस्नेह मोठा दुर्धर आहे. अथवा हा मानस मोहग्रंथि सर्व साधारणच आहे. हा संसारतंतु केवळ अंतश्चर उपाधि होय. हा प्राणिमात्रास दुःख दिल्या वांचून रहावयाचा नाहीं.

गंगा—वत्से जानकी, हे देवि वसुंधरे, सावध हो, २. अमळ स्वस्थ हो.

पृथ्वी०—( सावध होऊन, ) अहो भागीरथी बाई, मी या सीतेला प्रसवलें असतां इची अशी अवस्था पाहून स्वस्थ कशी होईन. पहा इजवर कसे प्रसंग आले ते.

## आर्या.

चिरकाल वास दुर्घट पहिला राक्षसजना मधें घडला ॥
केवळ दुःश्राव्यचि तो हिज वर दुसरा प्रसंग जो पडला ॥ ४ ॥

गंगा—खरेंच गे बाई, पण असें आहे.

---

१ सर्व सोसणारी जी पृथ्वी तिलाही.

आर्या.

दुर्दैव दुर्विपाका द्याया जंतूस जैं उभें राहे ॥
त्याचा हात धराया सृष्टींत समर्थ कोण हो आहे ॥ ५ ॥

पृथ्वी०—भागीरथी बाई, तुह्मी ठीकच बोललां. पण रामभद्राला असें करणें योग्य होतें काय ? पहा बरें.

आर्या.

बाळपणीं जो पाणी धरिला स्वकरें न तो मनीं आणी ॥
न जनक न मी न वन्ही न कुल न वृत्ती न आपुली वाणी ॥६॥

सीता—हाय हाय, यांनीं प्राणनाथाचें स्मरण मला करून दिलें. हा प्राणनाथा, तूं कोठें आहेस ?

पृथ्वी०—वेडे मुली, आतां गे कशाचा तो तुझा प्राणनाथ ?

सीता—( लज्जित होऊन डोळ्यांत अश्रू आणून ) तूं ह्मणत्येस तेंही खरेंच.

राम०—माते वसुंधरे, मी तसाच झालों आहे खरा.

गंगा—बाई वसुंधरे, तूं या चराचर विश्वाचें शरीर असतां, अजाणा प्रमाणें आपल्या जांवयावर व्यर्थ कोप कां करत्येस?

श्लोक.

लोकीं मोठें अयश उठलें जी तिची अग्निशुद्धी ॥
लंकाद्वीपीं करविलि तिला मानिना लोकबुद्धी ॥
इक्ष्वाकूंचें कुलधनचि हें कीं जना रंजवावें ॥
ऐसें त्याला कठिण पडतां काय त्यानें करावें ॥ ७ ॥

लक्ष्मण—सर्वां मध्यें देवता अकुंठितज्ञानसंपन्न आणि अंतःसाक्षी असतात. त्यांत विशेषेंकरून गंगा. गंगे तुला नमस्कार असो.

राम०—हे माते गंगे, भगीरथाच्या कुळावर जो तुझा एक वेळ प्रसाद झाला तो आजपर्यंत चालत आला आहे. असाच पुढें असावा.

**पृथ्वी**—अहो गंगाबाई, मी सर्वदा तुह्मां वर प्रसन्नच आहें. पण काय करूं स्वाभाविक स्नेहाच्या अतिशयानें सहज माझ्या मुखावाटे असें निघालें. रामभद्राचा सीते वर किती स्नेह हें मी जाणत नाहीं असें नाहीं. मला तर असें वाटतें.

## आर्या.

सीतावियोगदुःखें त्याचा आत्मा कसा न कांचावा ॥
लोकोत्तर धैर्यानें कीं जनभाग्येंच राम वांचावा ॥ ८ ॥

**राम॰**—वडील असतात ते लेकरां वर अशीच दया करितात.

**सीता**—( रुदन करित हात जोडून ह्मणत्ये ) माते धरित्री, या समयीं मला तूं आपल्या पोटांत ठाव देशील तर बरें होईल.

**राम॰**—या समयीं तिणें दुसरें काय ह्मणावें ?

**गंगा**—इडा पिडा टळो. वत्से जानकी, असें कां ह्मणत्येस ? सहस्र वर्षें पर्यंत तूं खुशाल ऐस.

**पृथ्वी**—वत्से जानकी, या दोघां मुलांचें रक्षण करणें तुला अवश्य आहे.

**सीता**—हाय हाय, यासमयीं मी अनाथ झाल्यें आहें.

**राम॰**—हे त्द्दया, तूं वज्रा प्रमाणें कठिण आहेस खरें. कांकीं हीं अक्षरें ऐकून तुला भंग होत नाहीं !

**गंगा**—मुली, तूं सनाथ असतां अनाथ कां ह्मणत्येस ?

**सीता**—मज दुर्भाग्येला आतां कशाची सनाथता ?

**गंगा आणि पृथ्वी**—( सीतेला ह्मणतात. )

## आर्या.

त्रिजगाला मंगल जो आत्मा अवमानितेस कां त्याला ॥
तुझिया संगें वत्से आलें पावित्र्य फार आह्मांला ॥ ९ ॥

**लक्ष्मण**—प्रभो रामा, हें ऐकिलें ना ?

**राम॰**—सर्व लोकांनीं ऐकावें. म्यां एकट्यानें ऐकून काय ?

( इतक्यांत पडद्या पलीकडे गलबला होतो. सर्व कान दे-
ऊन ऐकतात.

राम०—ही कांहीं तरी मोठी आश्चर्याची गोष्ट आहे.

सीता—ही अंतरिक्षांत दाटी कशाची झाली बरें?

गंगा आणि पृथ्वी—होहो, समजलों.

आर्या.

कृशाश्व कौशिक राघव ऐशी हे गुरुपरंपरा ज्यांची ॥
तीं दिव्य जृंभकास्त्रें झाली दाटी नभांत ही त्यांची ॥१०॥

( पडद्यांतून शस्त्र देवतांचा शब्द होतो. )

आर्या.

देवि नमस्ते सीते आह्मां गति पुत्र हे तुझे जाण ॥
आलेख्यदर्शनीं जें वदला श्रीराम तें मनीं आण ॥ ११ ॥

सीता—ही मोठी दैवाची गोष्ट कीं, शस्त्रदेवता प्रगट होऊन प्र-
साद करितात.

लक्ष्म०—( मनांत.) रामचंद्र त्या वेळेस जानकीला असें बोल-
ला होता खरें. कीं, आतां हीं अस्त्रें सर्व प्रकारें तुझ्या
संततीस उपतिष्ठतील.

गंगा आणि पृथ्वी—( अस्त्र देवतांस उद्देशून ह्मणतात.)

ओंव्या.

नमन तुह्मां परमास्त्रांतें ॥
राघवें स्वीकारिलें तुह्मांतें ॥
पावलां त्याचिया पुत्रांतें ॥
कल्याण सदा तुह्मां असो ॥ १२ ॥

राम०—या समयीं माझी अवस्था कशी हें मला समजत नाहीं.

श्लोक.

कल्लोळ थोर उठती करुणारसाचे ॥
आनंदविस्मयभरें भरणार साचे ॥

देतात जी मम दशा त्हृदयास कांहीं ॥
ती सांगतांहि मज सांप्रत येत नाहीं ॥ १३ ॥

**गंगा आणि पृथ्वी**—वत्से जानकी, तुझे पुत्र रामभद्रा सारखेच झाले आहेत, असें तूं समज.

**सीता**—अहो मातांनो, तुह्मी ह्मणतां तें खरें, पण या माझ्या मुलांचें क्षत्रियोचित संस्कारकर्म कोण करील ?

**राम०**—( मनांत ह्मणतो हाय हाय काय दैव हें ?

श्लोक.

गोप्ता वसिष्ठगुरु ह्या रघुच्या कुलाची ॥
जी वंशवर्धनकरी जननी मुलांची ॥
त्या जानकीस नकळे बहुकष्ट साचे ॥
संस्कार कोण करतो ह्मणते सुतांचे ॥ १४ ॥

**गंगा आणि पृथ्वी**—वत्से, ही चिंता तूं कशाला करित्येस ? तुझे मुलगे अमळसे मोठे झाले ह्मणजे, आह्मी वाल्मीकि मुनीच्या स्वाधीन करूं. मग तो त्यांचे क्षत्रियोचित सर्व संस्कार करील. चिंता करूं नको.

श्लोक.

जसे वसिष्ठांगिरस ऋषी वाल्मीकि ही तसा ॥
जनकांच्या रघूंच्याही वंशीं गुरु नव्हे कसा ॥ १५ ॥

**राम०**—उभयतां देवींनीं योजना चांगली केली.

**लक्ष्म०**—प्रभो रामा, मी खरेंच सांगतों. या सर्व लक्षणांवरून हे दोघे वत्स, कुश, लव असावे. असा तर्क होतो.

श्लोक.

हे दोघे जन्मसिद्धास्त्र वीर द्वादशवार्षिक ॥
वाल्मीकिमुनिपासून प्राप्त संस्कार दीसती ॥ १६ ॥

**राम०**—वत्सा लक्ष्मणा, या मुलांस पाहून माझें तर त्हृदय घों-

टाळ्यांत पडलें. मला कांहींच सुचत नाहीं. मी अगदीं वेड्या सारखा झालों आहें.

पृथ्वी—वत्से जानकी, इकडे ये, रसातलास पवित्र कर.

राम०-हा प्राणप्रिये जानकी, एकून तूं लोकांतरास चाललीसना?

सीता—माते धरणी, आतां मला तूं आपल्या पोटांत ठाव दे, हा जीवलोकींचा दुःखरूप परिणाम अनुभवायास मी समर्थ नाहीं.

राम०—आतां याहून दुसरें काय व्हावयाचें आहे?

पृथ्वी—वत्से, आतां मी सांगत्यें एवढें ऐक. हीं मुलें स्तनपानापासून सुटत तोंपर्यंत धीर धरून अशीच रहा. मग पुढें तुला सुचेल तसें कर.

गंगा—होहो असेंच केलें पाहिजे.

( मग गंगा, पृथ्वी आणि सीता या निघून जातात. )

राम०—काय, शेवटीं विदेहकन्येचा विलयच झाला! हा देवी, हा प्राणप्रिये, दंडकारण्यवासांत सुख देणारे हा प्रियसखी, हा चारित्र देवते, मला टाकून कशी गे तूं लोकांतरास गेलीस! ( असें ह्मणून मोह पावतो. )

लक्ष्म०—हे भगवंता वाल्मीकि कृपा करा आतां, असाच का तुमच्या काव्याचा अर्थ आहे? तर पुरे. हरहर! (इतक्यांत पडद्यांतून शब्द होतो. ) पुरे पुरे आतां, वाद्यें बंद करा. हे स्थावरजंगम जीवांनो, हे मर्त्यामर्त्यांनो, पहा भगवान् वाल्मीकिऋषि याची पवित्र आणि आश्चर्यकारक आज्ञा आहे.

लक्ष्म०—(तिकडे अवलोकन करून.) पहा हें आश्चर्य काय तें!

श्लोक.

जाणो मंथें क्षोभलें सिंधुतोय ॥
देवर्षीनीं व्याप्त आकाश होय ॥

गंगा भूमीदेविशीं युक्त झाली ॥
सीता तोया पासुनी हे निघाली ॥ १७ ॥

( पुन्हा पडद्यांतून शब्द होतो. )

आर्या.

बाइ अरुंधती आह्मी गंगा पृथ्वी अह्मां कडे पाहीं ॥
तुज अर्पिली पवित्रा सीता शंका धरूं नको कांहीं ॥ १८ ॥

**लक्ष्मण**—आमचें मोठेंच दैव. केवढें हें आश्चर्य! आर्या रामा पहा पहा तिकडे. ( रामा कडे पाहून ह्मणतो. ) हाय हाय, माझा राम अजून सावध होत नाहीं?

( इतक्यांत अरुंधती आणि सीता या दोघी येतात. )

**अरुंधती**—( सीतेला ह्मणत्ये. )

आर्या.

येये सत्वर वत्से क्षणभर सोडोन भीड वत्साचा ॥
वांचीव जीव त्याच्या ह्रदयाला स्पर्श करुनि हस्ताचा ॥ १९ ॥

**सीता**—( त्वरेनें जांऊन रामचंद्रास स्पर्श करून ह्मणत्ये. ) हे प्राणनाथा, सावध हो, सावध हो.

**राम०**—( सावध होऊन आनंदानें ह्मणतो. ) अहो हें काय झालें? ( निरखून पाहून सानंदाश्चर्यानें ह्मणतो ) कोण ही देवी जानकी? (लज्जायुक्त व विस्मययुक्त होऊन,) कोण ही माता अरुंधती? ऋष्यशृंग शांतादेवी सुद्धां ही सर्व वडील मंडळी हर्षयुक्त होत्साती एथें मिळाली हें काय?

**अरुंधती**—वत्सा रामा, ही भगीरथाची कुलदेवता गंगा, ही तुज वर सुप्रसन्न झाली आहे.

( पडद्यांत गंगेचा शब्द होतो. ) हे जगत्पते रामभद्रा, चित्र दर्शन प्रसंगीं तूं मला काय ह्मटलें होतें त्याचें स्मरण कर. कीं, ही सीता तुझी धर्माची सून आहे, इचें कल्याण अ-

रुंधती प्रमाणें सदा इच्छित जा ह्मणून, त्या प्रमाणें करून मी उतराई झाल्यें बरें ?

**अरुंधती**—ही तुझी सासू देवी वसुंधरा.

(पुनः पडद्यांत पृथ्वीचा शब्द होतो.) हे रामभद्रा, सीतेचा त्याग केला त्या वेळेस तूं मला ह्मटलें होतें कीं, हे विश्वंभरे क्षमे या जानकीचें रक्षण कर ह्मणून. तें तुझें वचन मनांत ठेवून त्या प्रमाणें मीं ही केलें बरें ?

**राम०**—मी महा अपराधी असतां या देवी मज वर दया करितात, तर कसा मी यांस प्रणाम करूं ?

**अरुंधती**—अहो पौर जानपद सकल जन हो, भगवती जान्हवी आणि वसुंधरा यांनीं अशी प्रशंसा करून जी मज अरुंधतीच्या स्वाधीन केली, जिचें पुण्यचरित्र भगवान् वैश्वानर याणें निर्णीत केलें, जी ब्रह्मादि देवांनीं स्तविली जी सूर्य वंशीय राजांची कुलवधू, जी देवयज्ञापासून उत्पन्न झाली अशी ही सीता देवी घ्यावी, निःशंकपणें घ्यावी, असें सर्व देवतांचें ह्मणणें आहे तर आतां यावर तुमचें ह्मणणें काय आहे तें बोला.

**लक्ष्मण**—पहा अरुंधतीनें निर्भर्त्सना केल्या वरून सर्व प्रजा आणि सर्व प्राणिसमुदाय जानकीस वंदन करीत आहेत. तसेच लोकपाल आणि सप्तऋषि तिजवर पुष्पवृष्टि करीत आहेत. वाहवा, काय चमत्कार हा !

**अरुंधती**—हे जगत्पते रामभद्रा, आतां मी सांगत्यें तें ऐक.

श्लोक.

घेई तुझी हे सहधर्मचारिणी ॥
सीता प्रिया जाणुनि पुण्यकारिणी ॥

टाकीं सुवर्णप्रतिमा धरा धवा ॥
योजीं इला धर्मपथींच राघवा ॥ २० ॥

सीता—( मनांत ह्मणत्ये ) माझा प्राणनाथ माझें दुःख दूर करण्या विषयीं समर्थ आहे.

राम०—जशी गुरुपत्नीची आज्ञा होईल तसें.

लक्ष्मण—मी आज कृतार्थ झालों.

सीता—आज माझ्या जिवांत जीव आला.

लक्ष्मण—हे जानकी, हा निर्लज्ज लक्ष्मण तुला वंदन करितो.

सीता—वत्सा, असा ही चिरकाळ वांच.

अरुंध०—हे भगवन् वाल्मीके, हे सीतागर्भापासून उत्पन्न झालेले रामभद्राचे पुत्र कुश, लव, नेऊन उभयतांस भेटवावे. ( असें ह्मणून निघून जात्ये )

राम, लक्ष्मण—दैवानें तसेंच व्हावें.

सीता—( डोळ्यांत अश्रु आणून, ) ते माझे बालक कोठें आहेत ? मला दाखवा.

( इतक्यांत वाल्मीकि आणि कुश, लव येतात. )

वाल्मीकि—हे वत्सा कुशा, हे वत्सा लवा, ऐका, हा तुमचा पिता रघुपति, हा कनिष्ठ तात लक्ष्मण, ही तुमची जननी जानकी, हा तुमचा मातामह ( आजा ) राजर्षि जनक यांस नमस्कार करा.

सीता—(हर्ष, करुणा आणि आश्चर्य यांहीं युक्त होत्साती अवलोकन करून ह्मणत्ये ) काय, हा माझा तात जनक !

कुश, लव—हा ताता रामा, हा माते जननी, हा मातामहा राजर्षे जनका !

राम,लक्ष्मण—(हर्षानें त्यांस आलिंगून ह्मणतात.) हे वत्सांनो, आमच्या पूर्व पुण्याच्या योगानें तुह्मी आह्मांस प्राप्त झालां.

सीता—येरे बाळा कुशा, येरे लेंकरा लवा, ही तुमची आई

पुनर्जन्म पावून तुह्मांस मिळाली आहे. हिला चिरकाल दृढ आलिंगन द्या.

कुश, लव—( सीतेस आलिंगून ह्मणतात. ) आज आह्मी धन्य झालों.

सीता—हे भगवंता वाल्मीके मी प्रणाम करित्यें.

वाल्मीकि—वत्से, अशीच चिरकाळ सुखी ऐस.

सीता—हा आमचा कुलगुरु वसिष्ठ, या माझ्या सासवा, ही सभर्तृका शांतादेवी, हा माझा दीर लक्ष्मण, हा माझा प्राण नाथ, हे पुत्र कुश, लव, सर्व सुप्रसन्न माझ्या दृष्टी समोर आहेत. आतां माझ्या आनंदास पार नाहीं. मी सुख-समुद्रांत निमग्न झाल्यें.

( इतक्यांत बाहेर गलबला होतो. )

वाल्मीकि—( ऐकून उठतो, आणि तिकडे पाहून ह्मणतो. ) ह्मां समजलें. लवणासुराचा वध करून मधुरेश्वर शत्रुघ्न आला. त्याच्या सैन्याचा हा गलबला.

लक्ष्मण—कल्याणें होऊं लागलीं ह्मणजे चोहोंकडून होतात.

राम०—या सर्वांचा मी अनुभव घेत असतां ही मला अजून खरें वाटत नाहीं. अथवा, अभ्युदयाचा स्वभावच असा कीं काय नकळे.

वाल्मीकि—हे रामभद्रा, तुझें आणखी प्रिय म्यां काय करावें तें सांग,

राम०—याहून आणखी प्रिय करावयाचें उरलें आहे काय ? तथापि आपण ह्मणतां त्या पक्षीं असें असो.

**श्लोक.**

मंगल्या[1] सुमनोहरा त्रिजगता[2] गंगे परी सर्वथा[3] ॥
पापापासुन रक्षिती[4] वितरती[5] श्रेयांस[6] जी ही कथा ॥

---

१ मंगलप्रदा. २ जगत्रयाला. ३ सर्वप्रकारें. ४ रक्षणारी. ५ देणारी. ६ कल्याणें.

तीतें संत सदा धरोत ह्रदयीं जो पक्कबुद्धी कवी ॥
त्याची वाणिसुधा नवी बुध सदा घेवोत तीची चवी ।

(मग सर्व निघून जातात.)

गर्भनामक सातवा अंक.

समाप्त.

उत्तर रामचरित्र नाटक समाप्त झालें.

भाषांतर कर्त्यांचे श्लोक.

आर्या.

वाणीभवभूतीची करुणरसाचीचहोयहेखाणी ॥
आणीजीश्रोत्यांच्या दृढह्रदयांच्याहिलोचनापाणी ॥ १
भवभूतीच्यायोगें भूधरकन्याचभासतेवाणी ॥
नाहींतररुदनाचा संभवहोईलकायपाषाणीं ॥ २ ॥
उत्तररामचरित्राभिध नाटकसंस्कृतांतजेंपहिलें ॥
त्याचेंहेंभाषांतर यथामतिप्राकृतांतम्यांलिहिलें ॥ ३ ॥
पुण्यग्रामींकेलें भाषांतरपरशुरामतात्यानें ॥
विद्वत्सभेसआदर पूर्वकहर्षेंसमर्पिलेंत्यानें ॥ ४ ॥

श्लोक.

सुवर्णपात्रींसुरसासिगोडी ॥
जीतीहुनीपर्णपुटींनथोडी ॥
असेलतेंदुर्लभपात्रज्याला ॥
तशीचतीयांतमिळेलत्याला ॥ ५ ॥
पिंगलाब्दींनऊसात सातएकशकींभला ॥
चैत्रशुक्लींपंचमीस ग्रंथसंपूर्णजाहला ॥ ६ ॥

